# नेमाडे यांचा जातीविचार आणि भारतीय जातीव्यवस्था

मराठीत ज्या मोजक्याच साहित्यिक चळवळी विसाव्या शतकात झाल्या त्यांतील देशीवादी चळवळ ही एक अतिशय महत्त्वाची चळवळ होय. किंबहुना मराठी साहित्याला उपकारक अशी दुसरी कुठली चळवळ मराठी भूमीत आधुनिक काळात झाल्याचे मला तरी दिसत नाही. वारकरी व महानुभव चळवळीनंतरची ही महत्त्वाची चळवळ मानायला हरकत नाही. मराठीचा कुठलाही सुजाण वाचक या चळवळीच्या ऋणात राहील. मात्र एखादी गोष्ट आपल्याला कायमची ऋणी करून ठेवते ह्याचा अर्थ ती कायमपणे बरोबरच असेल असे मात्र नाही. आयुष्य हे इतके गतिमान असते की ते सर्वच नव्या गोष्टी थोड्याच कालावधीत जुनाट करून टाकत असते. ह्या चळवळीची नव्या संदर्भात तपासणी करणे त्याचमुळे आवश्यक वाटते.

मराठीत देशीवादी चळवळीचे श्रेय कुणा एकाला देणे अवघड वाटते. मात्र एकंदरीत दिलीप चित्रे, चंद्रकांत पाटील आणि भालचंद्र नेमाडे ह्यांची नावे ह्या संदर्भात प्रामुख्याने घेतली जातात. ह्यातील दिलीप चित्रे यांना सत्यकथेचे आंतरराष्ट्रीय वारे थोडेफार लागल्याने त्यांची सुरुवातीची भूमिका देशी आहे का ? ह्याची शंका वाटते. 'पुन्हा तुकाराम'मध्ये मात्र ते पूर्णपणे देशीवादाच्या घरात आलेले दिसतात. अन्यथा त्यांच्या सुरुवातीच्या कालखंडात त्यांची समीक्षा देशीवादाच्या अंगणात नाचत असलेली दिसते. त्यांच्या भूमिकेला आत्मनिष्ठ देशीवाद म्हणता येईल. कदाचित दिलीप चित्रे हे प्रामुख्याने कवी असल्याने व नेमाडे हे प्रामुख्याने कादंबरीकार असल्याने दोघांच्या भूमिकेत आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ असा फरक पडला असावा. अनेकदा समीक्षक कुठला वाङ्मयप्रकार कलावंत म्हणून हाताळतो यावर त्याची समीक्षात्मक भूमिका अवलंबून असते. भालचंद्र नेमाडे हे बऱ्यापैकी कवी असल्याने (ते कादंबरीकार म्हणून थोर आहेत) पु.शि. रेगेंच्याबाबत त्यांची भूमिका दुभंगलेली आढळते. चंद्रकांत पाटील हे मध्यम दर्जाचे कवी आहेत (ह्याला 'निःसंदर्भ' काहीसा अपवाद) त्यांची समीक्षा ही वर्तमानपत्री व त्रोटक झालेली आढळते. त्यातच सत्यकथेचे समीक्षक इंग्रजीत फेऱ्या मारून मराठीतून आंतरराष्ट्रीय समीक्षा लिहायचे तसे हे गृहस्थ हिंदीत फेऱ्या मारून आणि इंग्रजीत चकरा टाकून समीक्षा लिहीत असल्याने त्यांची भूमिका ही मराठीपेक्षा हिंदीशीच जास्त निगडित झालेली आहे. हिंदीत गजानन मुक्तिबोध नावाच्या कवीने जी समीक्षा केली तिचा एक अस्पष्ट प्रभाव त्यांच्या समीक्षेवर जाणवतो. भालचंद्र नेमाडे

मात्र आरंभापासून अंतापर्यंत देशी समीक्षक म्हणून वावरताना दिसतात. देशीवादाची भूमिका अतिशय प्रभावीपणे त्यांनी मांडल्याने त्यांच्याभोवती एक 'कल्ट'वादी वलय तयार झालेले स्पष्टच दिसते आहे. त्यातच आमच्या आधीच्या पिढीतील रंगनाथ पाठारे ते राजन गवस वगैरे कादंबरीकार नेमाडेंच्या देशी नवतेचा अतिशय समर्थपणे आपल्या सृजनशील लेखनात विस्तार करत असल्याने त्यांचा सर्व खटाटोप यशस्वी होऊ लागलाय असे दिसते. किंबहुना त्यांचा हा विस्तार यशस्वी होणे मलाही मराठीच्या विकासासंदर्भात अतिशय आवश्यक वाटते. किंबहुना आमच्या आधीच्या पिढीची ती जबाबदारीच आहे असे मला वाटते.

मराठी समीक्षेच्या इतिहासात २२ ऑगस्ट १९८० ते २५ ऑगस्ट १९८० हे तीन दिवस फार महत्त्वाचे आहेत. कारण ह्याच दिवशी पॉप्युलर प्रकाशनाचे मालक श्री. रामदास भटकळ आणि शिवाजी विद्यापीठ यांनी एकत्र येऊन कोल्हापुरात मराठी साहित्यावर एक खुले चर्चासत्र आयोजित केले. ह्या चर्चासत्रात भालचंद्र नेमाडे यांनी अतिशय प्रभावीपणे देशीवादाचे समर्थन करून चित्रे, कोलटकर यांच्या कवितांपासून सुरू झालेली देशीवादाची घोडदौड निर्विवादपणे समीक्षक मान्यतेच्या अश्वमेध यज्ञानंतरच्या साफल्यापर्यंत न्हेली. विद्याधर पुंडलिकांचा थोडासा अपवाद करता नेमाडेंशी दोन हात करणे कुणाला जमले नाही आणि हातकणंगलेकरांसारखे समीक्षकही देशीवादाकडे कलले. त्यामुळे १९८० नंतर महाराष्ट्रातील अनेक नव्या सृजनशील ऊर्मी स्वखुशीने देशीवादाच्या राज्यात सामील झाल्या. ह्यानंतरचे श्री. पु. भागवत यांच्या सत्यकथेचे बंद पडणे हा योगायोग नव्हता. किरण नगरकरांची ' सात सक्कं त्रेचाळीस ' हा सत्यकथेने दिलेला शेवटचा ताकदीचा हुंकार होता. (ह्या कादंबरीत अस्तित्वाच्या काव्यात्मक अंगाचे पडसाद चांगले उमटले, पण सत्यकथेचे रोमॅण्टिक धुके वाजवीपेक्षा जास्त झाल्याने ' आशय स्पष्ट दिसणे ' अधूनमधून बंद झाले; मात्र चौथ्या नवतेच्या संदर्भात ही कादंबरी कोसलाइतकी नसली तरी बरीच महत्त्वाची आहे ह्याविषयी शंका नाही). ह्यापूर्वीच आनंद यादवांनी सत्यकथेतून देशी उडी घेऊन ग्रामीण साहित्याची चळवळ उभी केली होती. दलित चळवळीने आपले पाय आधीच फैलावले होते. ह्या सगळ्या पार्श्वभूमीवर देशीवादाची संपूर्ण चिकित्सा होणे आता आवश्यक वाटते. मराठीतील देशीवादाची चिकित्सा भालचंद्र नेमाडे यांच्या समीक्षात्मक लिखाणातून सुरू होते व सध्या तरी तिथेच संपते. दिलीप चित्रेंची समीक्षा ज्या दिवशी पूर्ण संकलनाच्या स्वरूपात सामोरी येईल तेव्हा तिचा विचार करता येईल. इथे नेमाडेंच्या ' टीकास्वयंवर ' ह्या पुस्तकातील देशीवादाची चिकित्सा केली आहे.

भालचंद्र नेमाडे यांच्या भूमिकेतील सर्वात मोठा विरोधाभास कोणता असेल तर तो

म्हणजे ज्या देशीवादाचे समर्थन ते करतात तो देशीवादच मुळात देशी नाही. मराठीतील सर्व विचाराप्रमाणे हा विचारही परदेशातून आयात केलेला आहे. भारतीयांच्याकडे एकमेव देशी गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे ' आळस ' ! (हे मी विनोदाने लिहितोय) त्यामुळे स्वतंत्र विचारसरणी तीही आपल्या आयुष्याच्या संदर्भात करणे इथल्या विचारवंतांना अद्यापही शक्य झालेले नाही. इथले आध्यात्मिक पुढारी मात्र नेहमीच इथल्या मातीशी निगडित राहिले आणि त्यांनी देशाऐवजी नेहमीच संपूर्ण विश्वासाठी पसायदान मागितलेले दिसते. माझ्या भूमिकेचे नाते त्यांच्याशी निगडित आहे हे मी प्रथमच स्पष्ट करतो. नेमाडेंनी वृक्ष या संकल्पनेचा वापर करून (जी त्यांच्या क्षत्रिय जाणिवेला साजेशी आहे) त्यांची भूमिका मांडल्याने प्रथम आपण तिचा विचार करू व नंतर जातिव्यवस्था ह्या देशीयतेच्या एका मुख्य आधाराकडे वळू.

विवेचनाला सुरुवात करताना आणखी दोन गोष्टी इथे सांगाव्याशा वाटतात. पहिली गोष्ट मराठीतील येऊ घातलेल्या पोरांसाठीच आहे. ( माझे सर्व समीक्षात्मक लिखाण त्यांच्यासाठीच असते. भारतातील म्हाताऱ्या विचारवंतांचा मेंदू वयोमानाप्रमाणे आपोआपच गुडघ्यापर्यंत सरकत सरकत येतो. त्यामुळे त्यांना काही सांगण्यात अर्थ असतो असे वाटत नाही. अर्थात काही सन्माननीय अपवाद आहेतच.) नेमाडे, चित्रे, पाटील प्रभृतींनी जो देशीवादाचा शोध घेतला तो काहीसा उलटा होता. हे देशीवादी फांद्यांतून मुळाकडे आले. नेमाडेंनी म्हटल्याप्रमाणे त्यांच्या पिढीने कधीच सुरुवातीला युरोपचा व्यास कोण हा प्रश्न विचारला नाही, तर भारताचा शेक्सपिअर कोण हा प्रश्न विचारला (पाहा, प्रतिष्ठानचा मे, जून १९९३ चा अंक) त्यामुळे सुरुवातीला ह्या लोकांनी आपल्या अस्तित्ववृक्षाच्या फांद्याच पकडल्या. ह्या फांद्यांवर लोंबकळताना जे असह्य ताण निर्माण झाले त्यातून ह्यांनी स्वतःला नीट उभे करण्यासाठी मुळाकडे धाव घेतली आणि त्यानंतर *'स्वतःची मुळे प्रथम घट्ट करा आणि मग तुमच्या फांद्या हव्या तेवढ्या विश्वभर न्या'* अशी भूमिका नेमाडे मांडू लागले. (' मराठी साहित्य : प्रेरणा आणि स्वरूप ' ह्या ग्रंथातील पान क्र. ७४ वर त्यांनी ही भूमिका मांडली आहे.) ह्या कल्पनेत साहित्यिक हा वृक्षासारखा असून त्याची मुळे परंपरेत रुजलेली असावीत आणि मग त्याने आपल्या फांद्या विश्वभर न्याव्यात असे अध्याहृत आहे.

नेमाडे यांच्या ह्या वृक्ष संकल्पनेत अनेक गफलती आहेत. पहिली गफलत म्हणजे हा वृक्ष सांस्कृतिक अर्थाने विदेशी आहे. त्यात मूळ केवळ खोल खोल जाते आणि फांद्या आकाशात वाढत जातात असे गृहीत धरलेय. नेमाडेंच्या दुर्दैवाने भारतीय वृक्षाची सांस्कृतिक संकल्पना वटवृक्ष (वड) आहे आणि मानवी अस्तित्वाच्या संदर्भात ती अधिक सार्थक आहे. वडाची मुळे

केवळ खोल झिरपत नाहीत तर पुन्हा वरच्या शाखांना पारंब्या फुटून खाली येतात आणि रुजतात तेव्हा जमिनीत मुळे आणि आकाशात फांद्या ही संकल्पना तितकीशी खरी नाही. मूळ, झाड, शाखा, शाखांतून पुन्हा जमिनीत शाखा, प्रशाखा असाच अस्तित्वाचा प्रवास असतो. तेव्हा अस्तित्वाने आपली मुळे केवळ आपल्या परंपरेतच रुजवातीत हा आग्रह चुकीचा आहे. अस्तित्वाने आपली मुळे केवळ देशीच नव्हे तर इतर विदेशी परंपरांतही सखोल न्यावीत आणि नित्य नव्याने शाखा-प्रशाखा वाढवत न्याव्यात. 'महाराष्ट्र देशी असावे' हा चक्रधरांचा उपदेश चित्रे आणि नेमाडे यांनी प्रमाण मानलाय,. पण तो पूर्ण चुकीचा आहे. त्यामुळे चक्रधर महाराष्ट्रापलीकडे मजल मारू शकले नाहीतच. उलट महाराष्ट्रातही त्यांच्या पंथाचा ऱ्हासच झाला. शेवटी वाढ ही अवकाश सतंत रुंदावत नेणारी प्रक्रिया आहे तिलाच तुम्ही देशाच्या मर्यादा घालाल तर संपाल. चक्रधरांनी ती घातली त्यामुळे चक्रधर संपले. ज्ञानेश्वरांनी विश्वासाठी पसायदान मागितले, ते वाढत राहिले आणि शेवटी तुकोबाच्या रूपाने आकाशाला भिडले. नेमाडेंनी कोसलात देशीयता नावाची भानगड येऊ दिली नाही. कोसला वाढत राहिली. बिढार, जरीला, झूलमध्ये देशी झाले आणि सगळी ग्रेस गमावून बसले. चित्रेंनाही आवडणारा ऑक्टोव्हिया पॉझ ' इस्ट स्लोप ' मध्ये आशियाई परंपरात मुळे न्यायला धडपडला. परिणामी उत्कृष्ट नाही तरी उत्तम कविता लिहू शकला. ह्याउलट दिलीप चित्रे ' बर्फाच्या दिवसात ' मध्ये महाराष्ट्र देशी वसल्याने कळत नकळत तिथल्या परंपरांच्या मुळांना पारखे झाले आणि फांद्याफांद्यावरच उड्या मारत राहिले. (विशेषतः रशियावरील कविता) तेव्हा आपली मुळे केवळ आपल्या देशी परंपरेतच रुजवावी़त हे म्हणणे तितकेसे खरे नाही.

नेमाडेंची ह्याच वृक्ष संकल्पननेतील दुसरी गफलत म्हणजे प्रथम मुळे नंतर फांद्या असा अनुक्रम. प्रत्यक्ष मानवी अस्तित्वाबाबत अनेकदा नेमकी उलट प्रक्रिया दिसते. बीजामध्ये केवळ मुळाच्या शक्यता कधीच नसतात. त्यात शाखा-फुले-पाने यांच्याही शक्यता सुप्तपणे असतात. त्यामुळे मानवी अस्तित्वाबाबत अनेकदा घडते असे की, फांद्या अधिक वाढू लागल्या की संपूर्ण वृक्षाचा तोल आणि संभार सांभाळण्यासाठी अस्तित्वाची मुळे अधिक खोल न्यावी लागतात. त्यामुळेच मानवाने आणि कलावंताने आपल्या फांद्या जगभर न्याव्यात आणि त्यातून पुन्हा आपली मुळे दुसऱ्या परंपरातही रुजवावीत. नेमाडे आणि चित्रे यांना देशीयतेचा लागलेला शोध हा त्यांच्या आंतरराष्ट्रीय विस्तारामुळे लागलेला शोध आहे. म्हणून माणूस जितका अधिक आंतरराष्ट्रीय तितका अधिक देशी असतो. माणसाला वैश्विक लिहिण्यासाठी अधिकाधिक खाजगी व्हावं लागतं. दुर्दैवाने मराठीत खाजगी संवेदनशीलता लपवून खोटं खोटं रोमॅण्टिक आणि सामाजिक लिहिण्याची परंपराच फोफावल्याने मराठी साहित्य वैश्विकतेला पारखे झालेले दिसते. उदा.

जातीयतेचा अनुभव प्रत्येकाला येतो, आला. पण त्याविषयी साहित्यात मात्र कुणी लिहिलं नाही. ह्याउलट दलितांनी खाजगी आत्मचरित्र लिहिण्यास सुरुवात करताच जातिव्यवस्थेचे सर्वंकष स्वरूप समोर आले. भारतातील रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, गांधी, आंबेडकर हे महापुरुष अधिक आंतरराष्ट्रीय होते म्हणूनच अधिक देशी झाले. त्याउलट लो. टिळक आणि सावरकर हे देशीवादी असल्याने सर्वांत कमी देशी झाले (सावरकरांचा ह्याबाबतीतला अहंकार इतका मोठा की सावरकरांना एकदा त्यांच्या अनुयायाने ' तुम्ही मार्क्स वाचला होता का ? ' असे विचारले असता सावरकरांनी त्याला उत्तर म्हणून प्रतिप्रश्न केला- " मार्क्सने सावरकर वाचला होता का ?") ह्यातील कळीचा मुद्दा असा की, तुम्हाला अस्सल देशी होण्यासाठीही आंतरराष्ट्रीय असावे लागते. अमेरिकेतील भारतीय माणसाला स्वतःचा Indianness जेवढा जाणवेल तेवढा भारतातल्या भारतीयाला जाणवणार नाही. कारण तुलना करण्यासाठी मुळातच त्याच्यासमोर दुसरी संस्कृती नाही.

नेमाडेंच्या ह्या वृक्ष संकल्पनेतील तिसरी गफलत म्हणजे मुळाचा विकास हा फक्त मर्यादित देशातच होतो हे त्यांचे गृहीतक. प्रत्यक्षात माणसाचे अस्तित्व ही एक अनंत शक्यता असलेली बीजस्थिती आहे. त्यामुळे एखाद्याची मुळे केवळ देशातच नव्हे तर परदेशापर्यंत भिडतात आणि ती तशी विस्तारतच राहतात. माणसाचे अस्तित्वभान हे केवळ देशी परंपरेतूनच नव्हे तर आंतरराष्ट्रीय परंपरांच्या समावेशनातून आणि समायोजनातूनही विकसित होत असते. माणसाचा अस्तित्ववृक्ष फांद्याने वाढत जातो तसेच मातीखालीही मुळाने पसरत पसरत जातो.

नेमाडेंची चौथी गफलत म्हणजे त्यांचा ' कलमी ' प्रक्रियेवर असलेला अविश्वास. माणूस हे एक झाड मानले तर त्याच्यावर इतर अनेक परंपरांची झाडे कलम करता येतात आणि त्याचा त्या कलमाला आणि झाडाला दोघांनाही फायदा होऊ शकतो. उदाहरणार्थ, भारतीय संस्कृतीवर पाश्चात्त्य विज्ञानविद्येचे झालेले कलम. नेमाडेंना कलमी व्यवस्था लक्षात घ्यावीशी वाटत नाही. कारण त्यांची वृक्षाविषयी संकल्पना ही क्षत्रिय आहे. वैश्य जाणिवेत वृक्षाकडे बघण्याचा दृष्टिकोनच बदलला आहे.

नेमाडेंची ही वृक्षसंकल्पना एका अर्थाने आधारशील असल्याने तिचा ऊहापोह केला. नेमाडेंच्या दुसऱ्या गोष्टीचा विचार आता करू.

नेमाडेंची सर्व समीक्षा पाहिली तर त्यांनी एक स्टान्स घेतलाय हे सतत जाणवते. नेमाडेंच्या ह्या भूमिकेत सतत सार्त्रच्या अस्तित्ववादी वृत्तीचा स्टान्स जाणवत राहतो. त्यांचा हा स्टान्स

देशी नाही एवढे इथे नमूद करावेसे वाटते. नेमाडे हे अलिकडच्या काळातील मराठी साहित्याच्या रंगभूमीवर नेमका काय रोल करायचा आहे याची पूर्ण कल्पना असलेले पहिले समीक्षक आहेत. आपल्याकडील बहुतेक समीक्षकांचा कुठल्याच मूल्यावर ठाम विश्वास नसतो; त्यामुळे ह्यांची समीक्षा म्हणजे केवळ ॲकॅडेमिक जोर-बैठकांची व्यायामशाळा बनते. उदारमतवादाच्या गोंडस नावाखाली कसलीही मूल्ये नसलेली समीक्षा हे लोक लिहितात. उदारमतवादाचा अर्थ इतरांच्या सर्व मतांविषयी उदार असणे, आदर बाळगणे हा आहे. ह्या भूमिकेत माझी भूमिका ठाम आहे, तशी तुझी भूमिका ठाम आहे. पण मी तरीही तुझ्या भूमिकेला मान देतो हे अभिप्रेत आहे. आपल्याकडील समीक्षकांनी मात्र ह्याचा अर्थ '' माझी भूमिका, सर्व समीक्षा सर्व मतांना खुली '' असा केला आहे. त्यामुळे एकाच समीक्षकाच्या समीक्षेत रसविचारापासून आदिबंधात्मक, अस्तित्ववादी विचारापर्यंत सर्व विचार सुखेनैव नांदतात आणि ह्या विचारात त्या समीक्षकाचा स्वतःचा असा काही विचार दिसत नाही. नेमाडेंच्या स्टान्समध्ये असा लेचेपेचेपणा दिसत नाही. त्यांच्या समीक्षेचा हा एक महत्त्वाचा गुण मानायला हरकत नाही.

माझा स्वतःचा स्टान्स हा थोडासा वेगळा आहे. मला वाटतं, परिवर्तनाचा वैश्विक स्टान्स (जो देशीही आहे) हा गौतम बुद्धाने स्वतःच्या उदाहरणाने सिद्ध केलाय आणि हा स्टान्स सार्त्रपेक्षा अधिक थोर व प्रगल्भ आहे. कारण तत्त्वज्ञानापेक्षा करुणा ही अधिक उंचीची गोष्ट आहे असे मला वाटते. हजार कवितांपेक्षा प्रेम आणि समग्र मनापेक्षा (ज्याला बुद्ध आत्मा म्हणतो) महानिर्वाण ही अधिक मूल्यवान गोष्ट आहे असे मला वाटते. माझा स्वतःचा स्टान्स हा बुद्धाचा करुणावाद, भांडवली अर्थव्यवस्था प्रमाण मानणारा वैज्ञानिक भांडवलशाहीवाद, चातुर्वर्ण्य नाकारणारा उपनिषदिक आनंदवाद (वेद, स्मृती आणि चातुर्वर्ण्य मानणारी सर्व पुराणे व उपनिषदे ही सर्व रद्दी आहे असे माझे स्पष्ट मत आहे) ह्या त्रिसूत्रींवर आधारित आहे. ह्या त्रिसूत्रीवर फुले-आंबेडकरांचा प्रभाव पडणे अटळ आहे. मात्र बाबासाहेबांचा समाजवादाचा पुरस्कार मला मान्य नाही. मी माझ्या भांडवलविषयक दृष्टीला ' आनंदवादी भांडवलशाही' दृष्टी म्हणतो आणि हा आनंद घेण्याचा अधिकार जितका मानवाला आहे तितकाच मानवेतरांना आहे हे मान्य करतो व ' वृक्षवल्ली आम्हा सोयरी ' मानणाऱ्या तुकोबाच्या आनंदवादी पर्यावरणवादी दृष्टिकोनाला स्वतःची दृष्टी जोडून घेतो. भांडवलशाहीतील तृष्णेचे (हा शब्द मी बुद्धाच्या अर्थाने वापरतो) नियंत्रण केले नाही तर काय होते हे पर्यावरण नष्ट करायला निघालेल्या बुद्धू लोकांनी उघडपणे दाखवून दिले आहे. तेव्हा तरुण मराठी साहित्यकांनी मार्क्सवादाला विरोध करताना, मुक्त अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करताना पर्यावरणाबाबत भारताचा हजारो वर्षे चालत आलेला समायोजनाचा सुबुद्ध दृष्टिकोन साहित्यात

प्रकट करणे गरजेचे वाटते. जगाला आज त्याची गरज आहे.

नेमाडेंची समीक्षा ही मुख्यतः समाजशास्त्रीय व मानवशास्त्रीय आहे. तेव्हा तिच्या संदर्भात विचार करताना मला माझी जीवनदृष्टी थोडक्यात मांडणे आवश्यक वाटते. ही दृष्टी समाजशास्त्रज्ञाची नसून कलावंताची कुणालाही जाणवेल अशी आहे. जातिव्यवस्था व देशव्यवस्था हे नेमाडेंच्या देशीयतेचे दोन मुख्य आधार आहेत. त्यांचा विचार करताना प्रथम विश्वाचा व नंतर समाजाचा विचार करावाच लागतो. तेव्हा प्रथम आपण विश्वाचा विचार करू मग समाजाचा विचार करू आणि त्यानंतर जातिव्यवस्थेकडे वळू.

आपण आज विश्वाचे 'दर्शन' घेतले तर आपणाला विश्वाच्या दहा पातळ्या जाणवतात.

१) आहे
२) सृष्टी
३) वास्तव
४) तथ्य
५) प्रतिसृष्टी
६) प्रतिवास्तव
७) प्रतितथ्य
८) चिन्हसृष्टी
९) चिन्हवास्तव
१०) चिन्हतथ्य

ह्या दहाही पातळ्या आज अस्तित्वात आहेत. सर्वसाधारण भारतीय परंपरेत विश्व ही पातळी मूळ मानली जाते. इतर पातळ्या फांद्या मानल्या जातात. मला वाटते असे मानण्याची गरज नाही. मात्र विश्वाची 'आहे' ही पातळी ही आनंदरूप आहे असे मात्र निश्चितपणे आणि अनुभवाच्या आधारे मी म्हणेन.

विश्वाची आहे ही पातळी मितींच्याही पलीकडील आहे. इथे विश्व केवळ असते आणि त्याला अवकाश आणि काळाचे बंधन असत नाही. आहे सतत क्रियाशील असते. क्रियाशील आहे म्हणजे आहेन होय. ह्या आहेनचा अनुभव म्हणजे आहेनानुभव होय.

आहे जेव्हा मितींनी बद्ध असते तेव्हा ते 'सृष्टी' असते. सृष्टी म्हणजे मितींनी बद्ध केलेले 'आहे.' मानवाला सध्यातरी अवकाशाच्या लांबी, रुंदी, खोली ह्या तीन मित्या आणि काळ ही एक मिती अशा चार मित्या ज्ञात आहेत. शास्त्रज्ञांच्या अंदाजानुसार विश्वाला असंख्य मित्या असण्याची शक्यता आहे. आहे जेव्हा मितीत बद्ध होते तेव्हा ते असंख्य सांत रूपात प्रकट होते. आहेची ही सांत रूपे म्हणजे ' मितिक ' होय. मानव, वनस्पती, बेडूक, ससा वगैरे ही सर्व मितिके आहेत त्यांना मितिक म्हणण्याचे कारण ती मितींनी बद्ध आहेत. सृष्टी ही अशा अनंत मितिकांची

समष्टी असते.

सृष्टीतील मितिकांना आपण शरीर ही संज्ञा वापरू सृष्टीचे किंवा शरीराचे गोचर होणारे रूप म्हणजे वास्तव होय. सृष्टीत अनंत मितिके शरीरे असतात पण इंद्रियांना ती कधीच त्यांच्या मर्यादेमुळे संपूर्ण गोचर होत नाहीत. उदा. आपणाला एखाद्या शरीराचे तोंड दिसले तरी पाठ दिसत नाही. प्रत्यक्षात ते शरीर समग्र रूपात अस्तित्वात असते पण इतर शरीरांना ते समग्र रूप कधीच कवटाळता येत नाही.

इंद्रियांनी ग्रहण केलेल्या वास्तवाचे मितिकात रेकॉर्ड झालेले, मुद्रित झालेले रूप म्हणजे 'तथ्य' होय. तथ्य हे अनेकदा वास्तवाचे उमटलेले प्रतिबिंब असते. सर्वच मितिकांना ऐंद्रिय क्षमता नसते तसेच तथ्य निर्माण करण्यासाठी क्षमता नसते. काही मितिकात मात्र तथ्य निर्माण करण्याची क्षमता अफाट असते. उदाहरणार्थ, मानव. मानवात वास्तवाचे मेंदूत मुद्रण करून ठेवण्याची क्षमता अफाट आहे.

अनेक मितिकांजवळ सृष्टीत असलेल्या मितीकांतून नवी नवी मितिके तयार करण्याची सृजनशीलता असते. मितिकांनी उत्पादित केलेली मितिकांची समष्टी म्हणजे प्रतिसृष्टी होय. उदा. पक्ष्यांचे घरटे, मुंग्यांचे वारूळ इत्यादी. प्रतिसृष्टी निर्माण करण्याची सर्वात जास्त ताकद मानवाजवळ आहे. खुर्च्या, टेबल, पंखे वगैरे वगैरे मितिकांनी ही प्रतिसृष्टी गजबजून गेली आहे.

प्रतिसृष्टीच्या किंवा प्रतिसृष्टीतील ह्या मितिकांना 'वस्तू' असे म्हणता येईल. मितिकांचे गोचर होणारे रूप म्हणजे प्रतिवास्तव होय. प्रतिसृष्टीत अनेक मितिके असतात पण इंद्रियांच्या मर्यादेमुळे ती कधीच संपूर्ण गोचर होत नाहीत. प्रत्यक्षात ते मितिक समग्र रूपात अस्तित्वात असते पण इतर मितिकांना ते समग्र रूप कधीच कवटाळता येत नाही. प्रतिवास्तव म्हणजे अशा मितिकनिर्मित वस्तूंचे गोचर संवेदन होय.

इंद्रियांनी ग्रहण केलेल्या प्रतिवास्तवाचे मितिकात मुद्रित झालेले रूप म्हणजे प्रतितथ्य होय. हे अनेकदा प्रतिवास्तवाचे उमटलेले प्रतिबिंब असते. सर्वच मितिकांना ऐंद्रियक्षमता नसते तसेच प्रतितथ्य निर्माण करण्याची क्षमता नसते. काही मितिकात मात्र प्रतितथ्य निर्माण करण्याची क्षमता अफाट असते. उदा. मानव.

दोन मितिके दळणवळण साधताना अनेकदा तिसऱ्या मितिकाचा वा अंतर्गत भावाचा किंवा क्रियेचा संदर्भ येतो. अशा वेळी ते तिसरे मितिक वा भाव वा क्रिया प्रत्यक्ष दळणवळणात

सामील होणे शक्य नसते. उदा. दोन मानवातील एखाद्या झाडाचा उल्लेख. हे झाड प्रत्यक्ष घेऊन हिंडणे शक्य नसते किंवा तशी गरज नसते तेव्हा त्या झाडाऐवजी 'झाड' असा शब्द वापरला जातो. इथेच चिन्हांची निर्मिती होते. झाड हा शब्द इथे चिन्ह आहे. किंवा उदासी हा भाव, भय हा भाव, सावधानता हा भाव हे प्रत्यक्ष दाखवणे अशक्य बनते तेव्हा ते हावभाव, ध्वनी, भाषा निर्माण करून पोहोचवले जातात. थोडक्यात, मितिकांनी निर्माण केलेल्या चिन्हांची समष्टी म्हणजे चिन्हसृष्टी होय. चिन्हसृष्टी निर्माण करण्याची सर्वात जास्त ताकद मानवात आहे. शब्द, सूर, रेषा, रंग, आकार, फिल्म, रंगमंच वगैरेंनी ही चिन्हसृष्टी गजबजलेली आहे. 'मानव', सृष्टीतील झाड ह्या मितिकापासून खुर्ची हे प्रतिसृष्टीतील मितिक आणि ह्या दोन्ही मितिकातून 'झाड', 'खुर्ची' हे दोन शब्द वगैरे चिन्हे अशी निर्मिती करतो. मानव हाही विश्वाचाच अंश असल्याने मानवाने जन्माला घातलेली प्रतिसृष्टी आणि चिन्हसृष्टी हीही विश्वाचीच निर्मिती आहे. ह्यातील झाड ही निर्मिती श्रेष्ठ व खुर्ची किंवा खुर्ची हा शब्द कनिष्ठ असा भेद करणे योग्य नव्हे. मानवाने निर्माण केलेले अन्न नैसर्गिक आणि मानवाने निर्माण केलेली व्हिटॅमिनची टॅबलेट अनैसर्गिक हे गृहीतक योग्य नव्हे. ह्या विश्वात जे जे निर्माण होते ती ती विश्वाचीच निर्मिती आहे. ह्यातील कुठली निर्मिती चांगली, कुठली वाईट हे ठरवणे मात्र सहज शक्य आहे. उदा. प्रदूषण हे वाईटच मानले पाहिजे. पूर्वी चिन्हांची निर्मिती ही कनिष्ठ मानली जात असे. प्रत्यक्ष झाडापेक्षा 'झाड' हे शब्दचिन्ह दुय्यम मानले जात असे. अलीकडील देरिदा ह्या फ्रेन्च तत्त्वज्ञाने ह्या द्वैताला आव्हान देऊन प्रत्यक्ष झाडाइतकेच 'झाड' ह्या शब्दचिन्हाचे महत्त्व प्रतिष्ठित केले. पण चिन्हाचे महत्त्व प्रतिष्ठित करता करता प्रत्यक्ष झाडाचे महत्त्व दुय्यम झालेले दिसते, ही दोन्हीही टोके आहेत. प्रत्यक्ष झाड आणि 'झाड' हे शब्दचिन्ह दोघेही निर्मितीच्या पातळीवर समानच आहेत. मात्र प्रत्यक्ष झाड आणि 'झाड' हे शब्दचिन्ह, प्रत्यक्ष भाकरी आणि 'भाकरी' हे शब्दचिन्ह ह्यांच्यात कार्याच्या पातळीवर फरक आहे हे आपण मान्य करायला हवे. देरिदा याची मीमांसा ही मितिककेंद्री असल्याने आणि त्याच्याही मीमांसेत क्रिया/मितिक असे द्वैत अस्तित्वात असल्याने त्याचे क्रियेच्या पातळीकडे दुर्लक्ष झाले आहे. प्रत्यक्ष भाकरीने पोट भरते आणि भाकरी ह्या शब्दाने पोट भरत नाही. तर प्रत्यक्ष भाकरीने संदेशवहन शक्य नाही तर 'भाकरी' ह्या शब्दचिन्हाने संदेशवहन शक्य होते. इथे प्रत्यक्ष भाकरीचे काम भूक भागवणे हे आहे तर 'भाकरी' ह्या शब्दचिन्हाचे काम संदेशवहन करणे हे आहे. कोणी म्हणेल ह्यातील भूक भागवणे हे कार्य अधिक महत्त्वाचे आहे. प्रत्यक्षात असे म्हणता येणार नाही. भूक भागवणे आणि संदेशवहन करणे ही दोन्ही कामे जगण्याच्या

पातळीवर समामच आहेत. उदा. भूक लागली असता भाकरी खात असताना वाघ आला आणि जिवाच्या आकांताने एखाद्याने ओरडून 'वाघ आला' ह्या दोन शब्दचिन्हांच्या साहाय्याने धोक्याचा इशारा दिला आणि त्यामुळे तुमचा जीव वाचला तर इथे संदेशवहन हे कार्य जगण्याच्या पातळीवर फार महत्त्वाचे ठरल्याचे दिसते. आजकाल तर मानवाची सारी दुनियाच कम्युनिकेशनवर उभी आहे. त्यामुळे चिन्हांना दुय्यम स्थान देण्यात काहीच अर्थ नाही. मात्र संदेशवहन ही एक पातळी आणि भूक भागवणे ही एक पातळी आहे ह्याचे भान विसरू नये. ह्यात कुठलीच पातळी सरस किंवा अधिक अस्सल नाही. दोघीही सरस व दोघीही अस्सल आहेत.

ऐंद्रिय मितिकांना चिन्हसृष्टीचे किंवा चिन्हांचे गोचर होणारे रूप म्हणजे चिन्हवास्तव होय. चिन्हसृष्टीत अनंत चिन्हे असतात पण इंद्रियांना त्यांच्या मर्यादेमुळे ती संपूर्ण गोचर होत नाहीत. उदा. चित्रपटातील एका फ्रेममधील सर्वच गोष्टी आपणास गोचर होत नाहीत. किंवा पुतळ्याचे तोंड दिसते तेव्हा पाठ दिसत नाही. प्रत्यक्षात ते चिन्ह (चिन्हे हीही मितिक असतात हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे) समग्र स्वरूपात अस्तित्वात असते. पण इतर मितिकांना ते समग्र रूप कधीच कवटाळता येत नाही. चिन्हांचे इंद्रियांना गोचर होणारे रूप म्हणजे चिन्हवस्तू होय. चिन्हवास्तव हे अशा चिन्हवस्तूंची समष्टी होय.

इंद्रियांनी ग्रहण केलेल्या चिन्हवास्तवाचे मितिकात मुद्रित झालेले रूप म्हणजे चिन्हतथ्य होय. चिन्हतथ्य हे अनेकदा चिन्हवास्तवाचे उमटलेले प्रतिबिंब असते. आपणाला जी स्वप्ने पडतात ती तथ्य, प्रतितथ्य आणि चिन्हतथ्य ह्यांच्यामुळेच शक्य होतात. सर्वच मितिकांना ऐंद्रिय क्षमता नसते. तसेच चिन्हतथ्य निर्माण करण्याची क्षमता नसते. काही मितिकांत मात्र चिन्हतथ्य निर्माण करण्याची अफाट क्षमता असते. उदा. मानव.

विश्व ह्या सर्व पातळ्यात असते. प्रकाश जसा कण आणि तरंग स्वरूपात असतो तसेच हे विश्व ह्या दहा पातळ्यांत असते. ह्यातील कुठली पातळी पहायची वा अनुभवायची हे निरिक्षणकर्त्याच्या इच्छेवर अवलंबून असते. ह्या दहाही पातळ्यंतील अद्वैत अनुभवणे म्हणजेच मोक्ष होय. ह्या पातळ्यांत सतत अद्वैती, युग्म, विशिष्टाद्वैती आणि द्वैती अशा परस्परक्रिया चालू असतात. द्वैत निर्माण होणे ही जगण्याची तर अद्वैत निर्माण होणे ही असण्याची आद्य अट असते. अनेकदा द्वैत, युग्म आणि विशिष्टाद्वैत पातळीवर पोहचते. द्वैत, युग्म, विशिष्टाद्वैत आणि अद्वैत ह्या परस्परक्रियांचा हा खेळ म्हणजे लीला होय. ही लीला समजून घेऊन तिच्या पार जाणे हीच खरी साधना होय.

विश्वाला आहेच्या अंगाने जश्या अनेक पातळ्या असतात किंवा विश्व जसे ह्या आहेच्या पातळ्यात असते तसेच ते चित्ताच्या पातळ्यात आणि आनंदाच्या पातळ्यातही असते. विश्व सच्चिदानंद असते आणि ह्यातील कुठलेच अंग, कुठलाच आयाम वेगळा काढता येत नाही, वेगळा असत नाही. निरीक्षणकर्त्याला सर्व अंगे, सर्व आयाम वा सर्व पातळ्या कवटाळणे शक्य होत नाही तेव्हा तो ह्यातील एक किंवा दोन वगैरे निवडतो.

विश्व जसे 'आहे' आहे तसेच ते 'चित्त' आहे. किंबहुना जे 'आहे' तेच चित्तही आहे. चित्ताला मितीचे बंधन असत नाही. ते मितीपलीकडे आहे.

चित्त जेव्हा मितींनी बद्ध होते तेव्हा ते 'जाणीव' असते. जाणीव म्हणजे मितींनी बद्ध झालेले 'चित्त' होय आणि चित्त जेव्हा मितीत बद्ध होते तेव्हा ते असंख्य मितिकात सांत रूपात प्रकट होते. चित्ताची ही सांत रूपे म्हणजे जाणीव होय. प्रत्येक मितिकात ही जाणीव असते. प्रत्येक मितिकात त्या मितिकात बद्ध असलेली जाणीव असते. ही जाणीव त्या मितिकाला पूर्ण व्यापून असते. त्या त्या मितिकाला पूर्ण व्यापून असणाऱ्या ह्या जाणीवेला आपण त्या त्या मितिकाची पूर्ण जाणीव म्हणू शकतो. एखाद्या समाजाची जाणीव म्हणजे अशा त्या समाजातील मितिकांच्या पूर्ण जाणिवांची समष्टी असते. उदा. ग्रीक जाणीव म्हणजे ग्रीक समाजातील मितिकांच्या पूर्ण जाणीवांची समष्टी होय. ह्या मितिकात अर्थातच त्या समाजातील मानवांचा समावेश असतोच. इथे ग्रीक हा शब्द अवकाश आणि काळ ह्या मित्यांच्या संदर्भात वापरला आहे. हा अवकाश प्रामुख्याने भौगोलिक आहे. पुढेही भारतीय हा शब्द, मराठी हा शब्द अशाच तऱ्हांनी वापरले आहेत.

जाणिवेचे गोचर होणारे रूप म्हणजे बुद्धी होय. जाणिवेचे संपूर्ण रूप कधीच गोचर होत नाही. मितिकांना परस्परांची जाणीव तर संपूर्णपणे कधीच गोचर होत नाही.

जाणिवेचे मितिकात (मानवासंदर्भात प्रामुख्याने मेंदू) मुद्रित झालेले / होणारे रूप म्हणजे विचार होय. विचार निर्माण करण्याची क्षमता सर्वच मितिकात नसते. मात्र मानवात जाणीव मुद्रित करण्याची क्षमता अफाट आहे.

अनेक मितिकात सृष्टीत असलेल्या मितिकातून नवी मितिके निर्माण करण्याची क्षमता असते. मानवाजवळ (सध्यातरी) ह्या मितिकात जाणीव निर्माण करण्याची क्षमता हळूहळू येईल अशी चिन्हे दिसत आहेत. जैविक रोबो ही ती सुरवात असू शकेल किंवा जैविक संगणक. अशा मितिकातील जाणिवेला प्रतिजाणीव म्हणता येईल.

प्रतिजाणिवेचे गोचर होणारे रूप म्हणजे प्रतिबुद्धी होय.

प्रतिजाणिवेचे मुद्रित होणारे रूप म्हणजे प्रतिविचार होय.

ह्या संदर्भात मी लक्ष्यार्थाने अभिनयपटू (अभिनेता/ अभिनेत्री, नर्तक वगैरे) हे उदाहरण म्हणून सुचवेन. अभिनयपटू किंवा कलावंत हा स्वतःत त्या पात्राची प्रतिजाणीव, प्रतिबुद्धी आणि प्रतिविचार निर्माण करतो. इथे कलावंताला स्वतःचे मितिकरूप बदलणे शक्य नसते. पण त्या रूपात एखाद्या पात्राची प्रतिजाणीव, प्रतिबुद्धी आणि प्रतिविचार निर्माण करणे शक्य होईल/ असेल असे दिसते. भविष्यात अशा प्रकारची मशीन्स अस्तित्वात येतील अशी चिन्हे दिसत आहेत. त्यामुळे अभिनयपटूंच्या जागी जर अशी मशीन्स आली तर आश्चर्य वाटावयास नको. ही मशीन्स खऱ्या अर्थाने प्रतिजाणीव, प्रतिबुद्धी आणि प्रतिविचार ह्यांचे प्रतिनिधित्व करतील.

आहेचा विचार करताना चिन्हांचाही विचार केलेला होता. ह्या चिन्हांनाही जाणीव असते. जे जे सत आहे त्याला जाणीवही आहेच. त्यामुळेच चिन्हाला जाणीव असतेच. तिला आपण चिन्हजाणीव म्हणू शकतो. चिन्हविज्ञानात १) चिन्हे ही अर्थयुक्त असतात. २) चिन्हे ही सत्वयुक्त नसतात असे दोन महत्त्वाचे सिद्धांत सांगितले जातात. माझ्या मते हे दोन्ही सिद्धांत चुकीचे आहेत. इथे सत्वाचा नेमका अर्थ न कळाल्याने घोटाळा झाला आहे. वास्तविक अर्थ हाच चिन्हांचे 'सत्व' असतो. पेन ह्या प + ए + न + अ ह्या रचनेला पेन ह्या प्रत्यक्ष (?) रचनेप्रमाणेच द्रव्य कशाला हवे ? आता मी जो 'पेन' हा शब्द लिहिला तो कागदावरचा पेन हा शब्दच त्याचे शरीर आहे. हा पेन हा शब्द इतरांनी इतरत्र किंवा मीच लिहिलेल्या पेन ह्या शब्दापेक्षा अणूंची संख्या वगैरे बाबतीत निश्चितपणे वेगळा असतो. प्रत्येक माणसाचे हस्ताक्षर वेगळे असते आणि तो प्रत्येक शब्द जेव्हा लिहितो तेव्हा तो निर्माण होताना रीपीट होत नाही. फक्त प्रत्येकवेळी त्याची ही नवता तपासायला जी यंत्रसामुग्री हवी ती उपलब्ध नसल्याने आपण तो वेगळा मानत नाही. ह्या जगात एका माणसासारखा हुबेहूब दुसरा माणूस जसा निर्माण होत नाही तसेच कुठलेही चिन्ह हुबेहूब निर्माण होत नाही. जसे माणसाबाबतीत दोन डोळे कान वगैरेबाबतीत साम्य जाणवते आणि आपण हा माणूस आणि तोही माणूस असे म्हणतो तसेच श्रीधर तिळवेंनी लिहिलेला मघाच्या वाक्यातील पेन हा शब्द आणि ह्या वाक्यातील पेन हा शब्द दोन्ही पेन हाच शब्द प्रकट करतात असे आपण समजतो. आपल्या इंद्रियांच्या मर्यादेमुळे हा फरक कळत नाही. प्रत्येक चिन्हाचे सतरूप वेगळे असते. मात्र अनेक गायीतून 'गायत्व' आपण शोधून काढतो तसेच पेन ह्या शब्दांच्या अनंत शरीरातून आपण 'पेन शब्दत्त्व' शोधून काढतो. थोडक्यात, प्रत्येक चिन्हाला

स्वयंभू 'सत'रूप असते आणि सतरूप असते म्हणूनच जाणीवरूपही असते. तिला आपण चिन्हजाणीव असे म्हटले आहेच. एक गोष्ट पुन्हा आपण लक्षात घ्यायला हवी, अर्थ हाच चिन्हाचे सत्व असतो ह्याचा अर्थ चिन्ह वेगळे अर्थ हे सत्व वेगळे असा नाही. चिन्ह हेच अर्थसत्व असते.

चिन्हजाणिवेचे गोचर होणारे रूप म्हणजे चिन्हबुद्धी होय.

चिन्हजाणिवेचे मुद्रित होणारे रूप म्हणजे चिन्हविचार होय.

विश्व ह्याही सर्व पातळ्यात असते. ह्यातील किती व कुठल्या पातळ्या पहायच्या व अनुभवायच्या हे निरीक्षणकर्त्यावर अवलंबून असते. ह्याही पातळ्यात अद्वैत, विशिष्टाद्वैत, युग्म आणि द्वैत अशा परस्परक्रिया घडत असतात. ह्या सर्वच पातळ्यातील अद्वैत अनुभवणे म्हणजे मोक्ष होय.

विश्वाला आहे, चित्त हे जसे आयाम आहेत तसाच आनंद हाही आयाम आहे. विश्व निर्गुण की सगुण असा प्रश्न अनेकदा निर्माण होतो. वास्तविक विश्वाचे आहे (सत), चित्त हे आयाम निर्गुण तर आनंद हा सगुण आयाम आहे. त्यामुळेच विश्व निर्गुणही आहे आणि सगुणही आहे. विश्वाचा मूळ स्वभाव आनंद हाच आहे. (इथे 'मूळ' लक्षार्थाने वापरला आहे.)

मितीनी बद्ध झालेला आनंद म्हणजेच स्वभाव होय. स्वभाव हे आनंदाचे सांत रूप आहे. मितींनी बद्ध नसलेला स्वभाव म्हणजे आनंद तर मितींनी बद्ध असलेला आनंद म्हणजे स्वभाव होय. आनंद असंख्य मितिकात सांत रूपात प्रकट होतो. प्रत्येक मितिकात आनंद असतोच.

स्वभावाचे गोचर होणारे स्वरूप म्हणजे भाव होय. प्रत्येक मितिकात स्वभाव असतो पण तो संपूर्ण गोचर कधीच होत नाही. त्यामुळेच मितिकांना एकमेकाचे भाव कळतात. स्वभाव कळत नाही. मराठी भाषेवरील प्रकरणात ह्या भावांची यादी दिली आहे.

भावाचे मितिकात मुद्रित झालेले रूप म्हणजे भावना होय.

प्रतिमितिकात बद्ध झालेला किंवा निर्माण करण्यात आलेला आनंद म्हणजे प्रतिस्वभाव होय.

प्रतिस्वभावाचे गोचर होणारे रूप म्हणजे प्रतिभाव होय.

प्रतिभावाचे मुद्रित होणारे रूप म्हणजे प्रतिभावना होय.

जाणिवेची चर्चा करताना मी कलावंतांचा उल्लेख केला होता. विशेषतः अभिनयपटू. कलावंत स्वतःत त्या त्या पात्राची केवळ प्रतिजाणीव, प्रतिबुद्धी आणि प्रतिविचार निर्माण करत नाहीत तर ते प्रतिस्वभाव आणि प्रतिभावनाही निर्माण करतात. भविष्यातील जैविक रोबो किंवा

जैविक संगणकामध्ये प्रतिस्वभाव, प्रतिभाव आणि प्रतिभावनाही निर्माण केल्या जातील. अशा प्रकारची यंत्रे सध्या अस्तित्वात नाहीत पण पुढे निर्माण होणार नाहीत याची खात्री नाही.

प्रत्येक चिन्हाला जसे स्वतःचे सतरूप असते, जाणीव असते तसाच प्रत्येक चिन्हात बद्ध झालेला आनंदही असतोच. चिन्हात बद्ध झालेल्या आनंदाला चिन्हस्वभाव म्हणतात.

चिन्हस्वभावाचे गोचर होणारे रूप म्हणजे चिन्हभाव होय.

चिन्हभावाचे मुद्रित होणारे रूप म्हणजे चिन्हभावना होय. उदा. 'मला तुझा राग आलाय' किंवा 'चालता हो इथून' ह्या वाक्यात क्रोध हा चिन्हभाव आहे तर चिन्हातून त्या क्रोधाचे मुद्रित झालेले रूप आपणाला जाणवेल. ती क्रोधाची चिन्हभावना आहे. ह्या चिन्हात जिथून चिन्ह निर्माण झाले त्यावेळचा सगळा स्वभाव असला तरी तो सगळाच गोचर होणार नाही. जो गोचर होईल त्यातील सगळाच आपल्यात मुद्रित होणार नाही. अद्याप भाव मोजण्याची यंत्रसामुग्री आपण विकसीत करू शकलेलो नाही. भविष्यात ही सामुग्री जशी जशी विकसित होईल तशा तशा आपल्याला ह्या पातळ्या अधिक तीव्रतेने जाणवायला लागतील.

अलीकडे काही व्यक्तींनी भाव मोजण्यासाठी पैसा हे एकक वापरायला सुरवात केली आहे. उदाहरणार्थ, तुम्ही अडचणीत आहात आणि तुम्हाला पाच हजार रुपयांची गरज आहे, तुमचे तीन स्नेही आहेत. एकाचा पगार दहा हजार, दुसऱ्याचा सहा, तिसऱ्याचा एक हजार आहे. तुम्ही त्यांच्याकडे गेलात. स्नेह ह्या भावाच्या आधारे तुम्ही पैसे मागितले. पहिल्याने दोन, दुसऱ्याने दोन, तिसऱ्याने पाचशे रूपये दिले. तर तिसऱ्याला दुसऱ्या-पहिल्यापेक्षा आणि दुसऱ्याला पहिल्यापेक्षा अधिक स्नेह वाटतो असे सिद्ध होईल. कारण पहिला त्याच्या मासिक उत्पन्नाच्या २०% दुसरा ३३.३३% तर तिसरा ५०% पैसे देतो आहे. (इथे इतर सर्व Constants एकच आहेत असे गृहीत धरले आहे.) भाव मोजण्याचा हा मार्ग कितपत योग्य आहे हा प्रश्न आहे. पण इथे नोटा ह्या चिन्हमितीकातून भाव अनुभवला आहे आणि मोजलाही आहे.

विश्व याही सर्व पातळ्यात असते. ह्यातील किती व कुठल्या पातळ्या अनुभवायाच्या व पहायच्या हे निरीक्षणकर्त्यांवर अवलंबून असते. ह्याही पातळ्यात अद्वैत, विशिष्टाद्वैत, युग्म आणि द्वैत अशा परस्परक्रिया घडत असतात. ह्या सर्वच पातळ्यातील अद्वैत अनुभवणे म्हणजे मोक्ष होय.

आपण पाहिलेल्या ह्या सर्व पातळ्या कोष्टकरूपात पुढीलप्रमाणे मांडू शकतो.

| विश्व | तृष्णा | मितिक | | | प्रतिमितिक | | | चिन्हमितिक | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सत्त | सुरक्षितता<br>संपादन<br>काम<br>हिंसा<br>आराम<br>कायापालट | सृष्टी | वास्तव | तथ्य | प्रतिसृष्टी | प्रतिवास्तव | प्रतितथ्य | चिन्हसृष्टी | चिन्हवास्तव | चिन्हतथ्य |
| चित्त | जिज्ञासा | जाणीव | बुद्धी | विचार | प्रतिजाणीव | प्रतिबुद्धी | प्रतिविचार | चिन्हजाणीव | चिन्हबुद्धी | चिन्हविचार |
| आनंद | प्रेम<br>भक्ती<br>स्नेह<br>आनंदसुख | स्वभाव | भाव | भावना | प्रतिस्वभाव | प्रतिभाव | प्रतिभावना | चिन्हस्वभाव | चिन्हभाव | चिन्हभावना |
| | | ह्यातील प्रत्येक पातळी ही १) द्रव्य २) उर्जा ३) गती ४) रचना यांनी युक्त असते. | | | | | | | | |

वरील कोष्टकातील सर्व पातळ्या ह्या चार घटकांनी युक्त असतात.

१) द्रव्य २) रचना ३) उर्जा ४) गती.

उदाहरणार्थ, मानवाचे शरीर. ते ज्या द्रव्यानी बनलेले आहे त्याचे मिळून एक द्रव्य बनते. उदा. कार्बन, कॅल्शियम ह्यातून एक संपूर्ण मानवी शरीर बनते. ह्या द्रव्याला रचना असते. जीवशास्त्रात आपण ह्या रचनेचा अभ्यास करतो. उदा. पचनसंस्था, मज्जासंस्था. हे शरीर केवळ रचना नसते. ते ऊर्जाही निर्माण करत असते. त्याच्यात अनेक ग्रंथींचे अस्तित्व असते आणि ते स्वतःही गतीशील असते.

चिन्हांचा अभ्यास करणाऱ्या चिन्हविज्ञानात आज चिन्हाचे दोन घटक मानतात. पहिला चिन्हार्थ, दुसरा चिन्हरूप. वरील पातळ्यांचा विचार केला तर ज्याला चिन्हार्थ समजले जाते ते दुसरे तिसरे काही नसून साधारणपणे चिन्हजाणीव आणि चिन्हस्वभाव आहे हे सहज लक्षात येईल. ज्याला चिन्हविज्ञानात चिन्हरूप म्हटले जाते ते चिन्ह होय. मात्र जाणीव ही फक्त चिन्हातून व्यक्त होते ह्यावर माझा विश्वास नसल्याने मी जाणीव आणि चिन्हजाणीव, बुद्धी आणि चिन्हबुद्धी, विचार आणि चिन्हविचार ह्या वेगळ्या पातळ्या मानल्या आहेत. त्याबरोबरच चिन्हरूप म्हणजे चिन्हशरीर हे संपूर्ण गोचर होते असे मी मानत नाही. उदा. पडद्यावरील अभिनेता हा चिन्हरूप असतो पण तो संपूर्ण गोचर होत नाही. कधी आपण त्याचा चेहरा बघतो कधी हात. चित्रपटाची चिन्हे ही मूलतः फ्रेम असते. प्रत्येक फ्रेम एक चिन्ह असते. प्रत्येक फ्रेम आपणाला संपूर्ण गोचर होत नाही. त्यामुळेच चिन्हवास्तव ही वेगळी पातळी असते. ह्या चिन्हवास्तवाचे आपल्या शरीरात जेव्हा मुद्रण होते तेव्हा ते चिन्हतथ्य असते. आपण स्वप्नात हे चिन्हतथ्य हवे तसे वापरत असतो. हीच गोष्ट चिन्हार्थालाही लागू आहे. चिन्हार्थाचे दोन घटक असतात. १) चिन्हजाणीव २) चिन्हस्वभाव. चिन्हातील हेही घटक पूर्णपणे गोचर होत नाहीत. त्यामुळेच चिन्हबुद्धी आणि चिन्हविचार, चिन्हभाव आणि चिन्हभावना ह्या वेगवेगळ्या पातळ्या असतात. ह्या सर्वच पातळ्यात अद्वैत असते. चिन्हमितिकापासून चिन्हजाणीव आणि चिन्हस्वभाव वेगळ्या असत नाहीत. मात्र निरीक्षकाने ठरवले तर तो ह्या वेगवेगळ्या पातळ्या म्हणून अनुभवू शकतो. त्याबाबत सस्युरची भूमिका ही द्वैती दिसते. देरीदाने तिला छेद देण्यासाठी अद्वैत स्वीकारले आहे. प्रत्यक्षात ह्या पातळ्यातील नाते हे द्वैती का अद्वैती की युग्मीय की विशिष्टाद्वैती हे निरीक्षकावर अवलंबून असते. प्रत्येक माणसाचे चिन्हाक्षरलेखन वेगवेगळे असते, चिन्हउच्चारण वेगवेगळे असते. इतकेच नव्हे तर वेगवेगळ्या अवकाशात आणि वेगवेगळ्या काळात ते वेगळे असते. कारण त्या चिन्हातील जाणीव आणि स्वभावही वेगवेगळे असतात. थोडक्यात जे चिन्हशरीर

आहे तेच चिन्हस्वभाव आहे आणि तेच चिन्हजाणीव आहे. मात्र निरीक्षकाने ठरवले तर तो यामध्ये फारकत वा भेद करू शकतो.

सर्वसाधारणपणे आज चिन्हविज्ञानात चिन्हार्थ आणि चिन्हरूपाचे द्रव्य आणि रचना असे दोन भाग केले जातात. म्हणजे चिन्हार्थ हे आशयांग मानून आशयद्रव्य आणि आशयरचना असे दोन पदर, तर चिन्हरूप हे आविष्कारांग मानून त्याचे आविष्कारद्रव्य आणि आविष्काररचना असे दोन पदर केले जातात. हे चौपदरी मॉडेल आज सर्वांनीच स्वीकारलेले आहे. माझ्या मते आतापर्यंतचे चिन्हवैज्ञानिक हे भाषावैज्ञानिक असल्याने त्यांनी जे काही मूलभूत घोटाळे केलेत त्यातून त्यांनी ही चार पदरी व्यवस्था स्वीकारलेली आहे. सस्युरची चिन्हार्थ आणि चिन्हरूप अशी दुपदरी तर येमस्लेव्हची आविष्कारद्रव्य, आविष्काररचना, आयशद्रव्य, आशयरचना ही चार पदरी व्यवस्था माझ्या मते अपुरी आहे. माझ्या मते द्रव्य आणि रचना यांच्याइतकेच उर्जा आणि गती हे दोन महत्वाचे घटक आहेत. ह्यासाठी आपण चित्रपटांचा एखादा शॉट घेऊ. ह्या शॉटचे आविष्कारद्रव्य हे अभिनेता, सेट, आवाज, फिल्म या साऱ्यांनी बनले आहे. (फिल्म म्हणजे कोरा कागद असे म्हणण्याचा मोह भाषावैज्ञानिकांना वारंवार होतो. प्रत्यक्षात अलीकडे वेगवेगळ्या फिल्म ह्या रंगाच्या आणि प्रकाशाच्या संदर्भात वेगळे परिणाम देत असतात. त्यामुळे शब्दचिन्ह कुठल्या कागदावर छापले जाणार ह्याचा विचार लेखक करत नाहीत. तसे दिग्दर्शकाला करता येत नाही. आपण कुठल्या कंपनीची फिल्म वापरणार आहोत हे दिग्दर्शकाला बघावेच लागते. माझ्या मते तर लेखनाबाबतही कागदासंदर्भात हाच विचार लागू होतो. उदाहरणार्थ, मलमूत्र वगैरे संदर्भातील कविता अत्यंत स्वच्छ बॉंड पेपरवर आणि पिवळ्या पडलेल्या न्यूजपेपरवर वेगळा परिणाम देते) ह्या शॉटची आविष्काररचना तो क्लोजअप की लॉंग शॉट ? वगैरेवर अवलंबून असेल. अर्थात दिग्दर्शकाला अपेक्षित असलेल्या आशयावरही ती अवलंबून असेल. ह्या शॉटमध्ये आशयद्रव्य असेल, म्हणजे त्यात स्वभाव आणि जाणीव, भाव आणि बुद्धी, भावना आणि विचार ह्यांचा फलक असेल, ह्या फ्रेममध्ये ह्या आशयाचीही एक रचना असेल. म्हणजे एखाद्या पात्रात असलेला क्रोध ही भावना साठवणे आणि मग रिॲक्शन म्हणून उमटलेली दया, पहिल्या पात्राला गोचर झालेला दया हा भाव, त्याने त्यांचा शरीरात दयेचं केलेले मुद्रण म्हणजे दया ही भावना ह्या साऱ्या आशयाची एक रचना दिग्दर्शकाच्या ह्या शॉटमध्ये असेल. पण शॉट केवळ ह्यांनीच युक्त नसतो, ह्या शॉटला गती असते. एका पात्राकडून दुसऱ्या पात्राकडे सरकणारा कॅमेरा एका विशिष्ट

गतीने जातो. अनेकदा त्या शॉटमधील अभिनेता हा चिन्हांश त्याच्या गतीने तो शॉट भारावून टाकतो. उदाहरणार्थ, अभिताभ बच्चन ह्या चिन्हांशाने पळणे. अभिताभचे पळणे हे माझ्या मते अतिशय ग्रेसफूल असते. त्या पळण्याच्या गतीला, त्यावेळच्या त्याच्या हालचालींना लय असते मात्र त्यातील उर्जा ही संयत असते. (उदा. दिवार आणि शक्ती हे चित्रपट) इथे गती हीही आशयद्रव्य, आशयरचना, आविष्कारद्रव्य, आविष्काररचना ह्यांच्याइतकीच महत्त्वाची ठरते आणि तीही कलेच्या अनुभवात महत्त्वाचा वाटा उचलते. सदमा ह्या चित्रपटातील कमल हसन ह्या चिन्हांशाचे पळणे. इथे केवळ गतीचाच आविष्कार नाही तर ह्या पळण्यात उर्जेचा स्फोट आहे. दिवारमधील बच्चनची उर्जा संयत आहे तर कमलची स्फोटक आहे. ह्या स्फोटात ज्या विलक्षण गतीने फ्रेम सरकते तिचाही वाटा आहे. विजय आनंदच्या ज्वेल थीफमधील 'होटो पे ऐसी बात' ह्या गाण्यात फ्रेमच्या झपाट्याने बदलत जाणाऱ्या गतीतत्वामुळे आणि ह्याचवेळी एस. डी. बर्मनच्या संगीतातील कायनेटीक एनर्जीमुळे ह्या गाण्याचा अनुभव विलक्षण समृद्ध वाटतो. अनेकदा शब्द तेच, आशय तोच असूनही बोलणारा विलक्षण उर्जेने बोलत असल्याने तो शब्दानुभव महत्वाचा ठरतो. एकवेळ आविष्कार आणि आशय ह्यांच्या द्रव्य आणि रचनेची पुनरावृत्ती शक्य होते. पण त्यांच्या उर्जा आणि गती ह्यांची पुनरावृत्ती शक्य होत नाही. त्यामुळेच अनुकरण करणारे लोक उघडे पडतात. ग्रेस ह्या कवीच्या कवितेतील आशय कळला नाही तरी तो अनेकांना उर्जा आणि गतीमुळे भारावून टाकतो.

थोडक्यात चिन्हांचा विचार करताना केवळ द्रव्य आणि रचना ह्यांचा विचार करून चालणार नाही तर उर्जा आणि गती ह्यांचाही विचार करावा लागतो. स्वभाव आणि जाणीव यांनी आशय सिद्ध होतो तर मितिकातून आविष्कार सिद्ध होतो असे मानले तर आपणाला

१) आविष्कारद्रव्य २) आविष्काररचना

३) आविष्कारगती ४) आविष्कार- उर्जा

५) आशयद्रव्य ६) आशयरचना

७) आशयगती ८) आशय -उर्जा असे आठ पदर मिळतात.

गंगाधर पाटील यांनी येमरस्लेव्हचे चौपदरी मॉडेल पुढीलप्रमाणे मांडले आहे.

| चिन्ह (Sign) | चिन्हांग | द्रव्यस्तर | रचनास्तर |
|---|---|---|---|
| चिन्हरूप Expression | श्रव्य आविष्कारांग | १) आविष्कारद्रव्य<br>नादद्रव्य<br>लघुत्तम घटक :<br>स्वन स्वनिम | २) आविष्काररचना<br>स्वन-स्वनिम रचना |
| | दृश्य | रंगद्रव्य / रेखाद्रव्य<br>लघुत्तम घटक :<br>बिंदू - रेखिम | रेखिमांची रचना<br>अक्षररचना |
| संबंध (Relation) | | | |
| चिन्हार्थ Content | आशयांग | ३) आशय द्रव्य<br>अर्थात्मक आशाय<br>विचारात्म, भावनात्म<br>अर्थघटक<br>लघुत्तम घटक :<br>अर्थ, अणू / अर्थिम | ४) आशय रचना<br>अर्थिमांची रचना<br>भावार्थ घटकांची रचना |

आपण आपले आठ पदरी मॉडेल पुढीलप्रमाणे मांडू.




| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आविष्कारद्रव्य | नादद्रव्य | स्पर्शद्रव्य | गंधद्रव्य | रुचीद्रव्य | सौष्ठवद्रव्य |
| आविष्काररचना | नादरचना | स्पर्शरचना | गंधरचना | रुचीरचना | सौष्ठवरचना |
| आविष्कारगती | नादगती | स्पर्शगती | गंधगती | रुचीगती | सौष्ठवगती |
| आविष्कारउर्जा | नादउर्जा | स्पर्शउर्जा | गंधउर्जा | रुचीउर्जा | सौष्ठवउर्जा |

| | | |
|---|---|---|
| आशयद्रव्य | जाणीवद्रव्य | स्वभावद्रव्य |
| आशयरचना | जाणीवरचना | स्वभावरचना |
| आशयगती | जाणीवगती | स्वभावगती |
| आशयउर्जा | जाणीवउर्जा | स्वभावउर्जा |

भाषा ही श्राव्य आणि दृश्य अशा दोन्ही पातळीवर असते, त्यामुळे ती नादद्रव्य आणि सौष्ठवद्रव्य ह्या दोन्हीतून निर्माण होते.

विश्वाच्या ह्या सर्व पातळ्यांचा विचार करताना एक प्रश्न उपस्थित होतो तो म्हणजे हे विश्व का निर्माण झाले ? हे विश्व कोठून आले ? हे विश्व कसे निर्माण झाले ? ह्या प्रश्नाची वैज्ञानिकांनी काही संभाव्य उत्तरे दिलेली आहेतच. ह्यांची आध्यात्मिक उत्तरे मात्र गोंधळ उडवणारी आहेत.

हे विश्व काय आहे ह्या प्रश्नाचे उत्तर 'सच्चिदानंद' असे आहे. ह्यावर कोणी विचारले की ह्याला पुरावा काय? तर त्याचे उत्तर या घडीला तरी 'सद्यातरी असा पुरावा देता येत नाही' असेच आहे. मी स्वतः ह्या अवस्थेचा अनुभव घेतल्याने मी माझ्यापुरते ह्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकतो. पण मी हा अनुभव दुसऱ्याला देऊ शकत नाही. मी म्हणेन की तुम्ही साधना करा. शेवटी विज्ञानातही सत्य सिद्ध करायचे असेल तर पुरावा लागतो आणि त्यासाठी प्रयोग करावा लागतो. साधना हा प्रयोगच आहे. कसल्याही प्रकारची साधना न करता, म्हणजेच प्रयोग न करता, जे लोक तार्किक बडबड करतात त्यांना विज्ञाननिष्ठ म्हणता येणार नाही. मला स्वतःला एक गोष्ट सांगावीशी वाटते ती म्हणजे प्रयोग करताना अनेकदा विशिष्ट तंत्रज्ञानाचा विकास व्हावा लागतो. उदाहरणार्थ, आकाशगंगेविषयीची वैज्ञानिक सत्ये सिद्ध होण्यासाठी, त्यासंदर्भात प्रयोग करण्यासाठी तुमच्याकडे दुर्बिणी विकसीत व्हाव्या लागतात. दुर्बिण नसेल तर प्रयोग अशक्यच आहे. आजघडीला तरी विश्वाच्या सच्चिदानंदाचा अनुभव येण्यासाठी यंत्र उपलब्ध नाही. मात्र भविष्यात असे यंत्र उपलब्ध होणारच नाही याची खात्री नाही. सध्यातरी माणसाचे 'मितीक' हेच यंत्र आहे आणि ते यंत्र नीट ऑपरेट व्हावे म्हणून आरंभीची साधना करावी लागते. यम, नियम, पंचशीले, बुद्धाचा अष्टांगमार्ग वगैरे सर्व प्रकार ह्या यंत्राला साफ आणि स्वच्छ करण्याचे उपाय आहेत. ह्या मितीकाचे, ह्या यंत्राचे 'शरीर' 'जाणीव' आणि 'स्वभाव' असे तीन आयाम आहेत. ह्या तिन्ही आयामापैकी एकाची शुद्धी झाली तरी उरलेले दोन आपोआप शुद्ध होतात. हे तिन्ही आयाम शुद्ध झाले की संपूर्ण विश्व तुमच्यात प्रवेश करते. सर्व द्वैते नष्ट होतात. ह्यालाच विश्वाचा 'कृपाप्रसाद' म्हणतात. बुद्धाने ह्या शुद्ध होण्यालाच शून्य होणे म्हटले आहे.

हे विश्व जे काही आहे त्यालाच तुम्ही उपलब्ध झाला की ते का निर्माण झाले हा प्रश्नच उरत नाही. हे असे का घडते ? माझ्या मते ज्याला आपण कार्यकारणसंबंध म्हणतो हा सांताने केलेला उपद्व्याप असतो. ह्या जगात सांताला टिकण्यासाठी 'का' हा प्रश्न विचारावा लागतो त्याला कार्यकारणसंबंध शोधावा लागतो. थोडक्यात कार्यकारणसंबंध हा सांताने सांतासाठी केलेला खटाटोप असतो. हे सांतत्व नष्ट झाले की कार्यकारणसंबंधही संपतो आणि विश्वाच्या संदर्भात हा प्रश्नच अप्रस्तुत आहे असा साक्षात्कार होतो. जिथे जाल तिथे विश्वच असल्याने

विश्व कोठून आले हा प्रश्न नाहीसा होतो. विश्वाच्या आधी काहीच नसल्याने विश्व कोठून आले हाही प्रश्न अप्रस्तुत होतो. मानवाचे सारे ज्ञान हे सांताने सांताचे किंवा अनंताचे प्राप्त केलेले ज्ञान आहे हे लक्षात येते. हे ज्ञान सांत आणि सांत किंवा सांत आणि अनंत ह्यांच्यातील द्वैतातून निर्माण झाले आहे हे लक्षात येते आणि ज्याक्षणी हे द्वैत नाहीसे होते त्या क्षणी ह्या ज्ञानातून निर्माण होणारे प्रश्नही नाहीसे होतात.

विश्वाच्या ह्या पातळ्यांचा विचार केल्यानंतर आपण 'ज्ञान' ह्या प्रक्रियेकडे वळायला हरकत नाही. आज सर्वसाधारणपणे ज्ञानाचा विचार करताना Subject, Object आणि Knowledge असे त्रय गृहीत धरले जाते. अनेकदा Subject आणि Object ह्यांच्यात द्वैत केले जाते. मला स्वतःला हे द्वैत मान्य नाही. म्हणूनच मी ज्ञानाला घटना असे म्हटले आहे. माझ्या मते ज्ञान ह्या घटनेत ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञानानुभव अशा तीन प्रक्रिया समाविष्ट असतात. ज्ञाता ही एक सतत चाललेली प्रक्रिया आहे. ज्ञेय हीही सतत असणारी प्रक्रिया आहे आणि ज्ञानानुभव ही सतत घडणारी प्रक्रिया आहे. ज्ञान म्हणजे ह्या तीन प्रक्रियांचा सतत चालणारा आणि चाललेला खेळ होय. ह्या प्रक्रियांत कधी अद्वैतावस्था असते कधी युग्मावस्था असते कधी विशिष्टाद्वैतावस्था असते तर कधी द्वैतावस्था असते. ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञानानुभव ह्या प्रक्रिया सतत बदलत असतात. त्यांच्या अवस्था क्षणिक असतात. Subject आणि Object अनेकदा स्थिर मानून त्यांच्यात नेहमीच द्वैत असते असे अनेकदा गृहीत धरलेले असते म्हणून हे आधी स्पष्ट करावे लागले. थोडक्यात जेव्हा मी ज्ञाता, ज्ञेय, ज्ञानानुभव, कर्ता, कर्म, कर्मानुभव वगैरे शब्द वापरतो तेव्हा त्या प्रक्रिया असतात हे गृहीत धरावे.

ज्ञान म्हणजे काय हे एकदा स्पष्ट झाले की ते का निर्माण होते ह्याचा विचार करता येईल. तृष्णा : दर्शन आणि बोध ह्या प्रकरणात मी तृष्णांचा सविस्तर विचार मांडणार आहे. इथे थोडक्यात माझे म्हणणे मांडत आहे. मितीक म्हणजे सांत आहे. आहेला आहे भोगण्यासाठी मितीरूपात प्रवेश करावा लागतो, त्यातून मितिकांची निर्मिती होते. ह्या मितिकांना भोवतालचे अनंत 'आहे' भोगायचे असेल तर प्रथम स्वतःचे अस्तित्व टिकवावे लागते. हे टिकवायचे असेल तर अनंत आहेचा काही भाग स्वतःत सामावून घ्यावा लगतो. उदा. हवा, पाणी, अन्न सामावून घेण्यासाठी कुठला भाग उचीत कुठला भाग अनुचित ह्याचे ज्ञान होणे आवश्यक असते. थोडक्यात टिकण्यासाठी म्हणजेच सुरक्षितता ह्या तृष्णेसाठी ज्ञानाची निर्मिती होते. संपादन, सत्ता वगैरे तृष्णांच्या पूर्तीसाठीही ज्ञान हे आवश्यकच असते. थोडक्यात तृष्णांच्या पूर्तीसाठीच ज्ञानाचा जन्म होतो. उदा. मनुष्याला टिकायचे असेल तर अन्न खावे लागते. पण हे अन्न म्हणून तो काहीही खाऊ शकत नाही. काय

खायचे ? काय नाही ? का खायचे ? का नाही ? ह्यासंदर्भात त्याला उचित -अनुचित ठरवावेच लागते. ह्यातूनच ज्ञानाची निर्मिती होते.

मनुष्याला केवळ ज्ञान होऊन चालत नाही तर ज्ञानाची यथार्थताही तपासावी लागते. ह्यातूनच प्रमाणांचा प्रश्न निर्माण होतो. कुठला ज्ञानानुभव यथार्थ मानायचा हेही प्रमाणांवर ठरते. भारतीय परंपरेत प्रमाणांची नेहमीच सविस्तर चर्चा करण्यात आलेली आहे. विशेषतः न्यायदर्शनाने ह्याबाबत केलेली कामगिरी ही स्तिमीत करणारी आहे. मी इथे थोडक्यात प्रमाणविचार मांडणार आहे.

ज्ञान ह्या घटनेत जिला ज्ञान होते ती ज्ञाता व जिचे ज्ञान होते ती ज्ञेय ही प्रक्रिया होय. ह्या दोन प्रक्रियांच्या परस्परसंबंधातून जी तिसरी प्रक्रिया घडते ती ज्ञानानुभव होय. ह्या तीन प्रक्रियांच्या संदर्भातच प्रमाणांचा विचार करता येतो.

माझ्या मते ज्ञानाची यथार्थता मानण्याची चार प्रमाणे आहेत.

१) अतिप्रत्यक्ष प्रमाण : जेव्हा ज्ञान ह्या घटनेत ज्ञाता आणि ज्ञेय एकमेकात उपस्थित असतात आणि ज्ञानानुभव ही प्रक्रिया उपस्थित होते आणि तरीही त्यावेळचे ज्ञान यथार्थ मानले जाते तेव्हा अतिप्रत्यक्ष प्रमाण मानले असे म्हणतात. उदाहरणार्थ मोक्षाचे ज्ञान, आत्मज्ञान.

२) प्रत्यक्ष प्रमाण : जेव्हा ज्ञान ह्या घटनेत ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञानानुभव या प्रक्रिया प्रत्यक्ष उपस्थित असतात आणि त्यावेळचे ज्ञान यथार्थ मानले जाते तेव्हा प्रत्यक्ष प्रमाण मानले असे म्हणतात. उदा. उंचावरून पडताना मनुष्याला गुरुत्वाकर्षणाचा येणारा अनुभव.

३) अनुमान प्रमाण : जेव्हा ज्ञान या घटनेत ज्ञाता ही प्रक्रिया प्रत्यक्ष उपस्थित असते, ज्ञेय मात्र स्वतः प्रत्यक्ष उपस्थित नसते पण दुसऱ्या ज्ञेयाच्या आश्रयाने उपस्थित असते आणि ज्ञानानुभव ही प्रक्रिया उपस्थित असते आणि त्यावेळचे ज्ञान यथार्थ मानले जाते तेव्हा अनुमान प्रमाण मानले असे म्हणतात. उदा. फळ पडते म्हणून पृथ्वीवर गुरुत्वाकर्षण आहे असे मानणे.

४) चिन्ह प्रमाण : जेव्हा ज्ञान ह्या घटनेत ज्ञाता ही प्रक्रिया प्रत्यक्ष उपस्थित असते. ज्ञेय आणि ज्ञानानुभव या प्रक्रिया चिन्हांच्या आश्रयाने उपस्थित असतात आणि त्यावेळचे ज्ञान यथार्थ मानले जाते तेव्हा चिन्ह प्रमाण मानले असे म्हणतात. उदा. भौतिकशास्त्राच्या शिक्षकाने चिन्हांच्या सहाय्याने पृथ्वीवर गुरुत्वाकर्षण आहे असे सांगणे आणि विद्यार्थ्याने ते यथार्थ म्हणून स्वीकारणे.

ह्या प्रमाणांची उभी श्रेणी लावण्याचे प्रयत्न वारंवार होतात. उदा. वैदिक जेव्हा वेदातील

सर्व सत्य असे म्हणतात तेव्हा ते चिन्हप्रमाण सर्वोच्च स्थानी ठेवतात तर बाकीची प्रमाणे खाली ठेवतात. अनेकदा वैज्ञानिक दृष्टिकोणाचा दावा करणारे लोक प्रत्यक्ष प्रमाण सर्वोच्च स्थानी ठेवतात. अतिप्रत्यक्ष प्रमाण नाकारतात, तर अनुमान प्रमाण व चिन्ह प्रमाण यांना दुय्यम आणि तिय्यम दर्जा देतात. वास्तविक मानवी जीवनात ह्या चारही प्रमाणांचे सारखेच महत्व आहे. चिन्ह प्रमाणाशिवाय शिक्षण व्यवस्था अस्तित्वातच येणार नाही किंबहुना चिन्हे आहेत म्हणूनच ज्ञानाचे दळणवळण शक्य आहे. ह्यातील सर्वात मोठा विरोधाभास कोणता असेल तर विज्ञानांचा मूलाधार जे गणित आहे ते चक्क चिन्ह प्रमाणाच्या आधारे उभे आहे. अनेक वैज्ञानिकदृष्टीचा दावा करणाऱ्या लोकांना हे माहीत नाही म्हणून हे आवर्जून सांगावेसे वाटते. अनेकदा वैज्ञानिक सिद्धांत चिन्ह प्रमाणाच्या आधारे मांडले जातात. अनुमानात्मक प्रमाणाच्या आधारे त्यांच्यावर चर्चा होते, त्यांच्यासाठी आधार शोधले जातात आणि सरतेशेवटी प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारे ते सिद्ध होतात. तेव्हा प्रमाणांचा पिरॅमीड कुणी उभा करू नये. थोडक्यात प्रमाणांची उभी श्रेणी लावणे चुकीचे आहे. सर्व प्रमाणे सारखीच महत्वाची आहेत.

ज्ञानाची यथार्थता तपासूनही मनुष्याला थांबता येत नाही तर त्याला ज्ञानाची सत्यताही तपासावी लागते. उदाहरणार्थ, एखादी गोष्ट यथार्थ असली तरी ती सत्य असेलच असे नव्हे. उदाहरणार्थ कला. कोणतीही कलाकृती ही चिन्ह प्रमाणाच्या आधारे आपण यथार्थ म्हणून स्वीकारतो. त्यातून होणारे ज्ञान हे यथार्थ असते पण ते सत्य असत नाही. प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारे ते सिद्ध होत नाही. उदाहरणार्थ, ज्युरॅसिक पार्क ह्या स्पिलबर्गच्या चित्रपटातील डायनॉसॉर हे यथार्थ असतील पण आपण प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारे ते सत्य आहेत की नाही हे तपासण्यासाठी गेलो तर ते काहीच प्रतिसाद देणार नाहीत. कारण ते सत्य नाहीत. आपली स्वप्ने ही यथार्थ असतात पण ती सत्य असत नाहीत. भास हेही यथार्थ असतात पण ते सत्य असत नाहीत. वैज्ञानिक सिद्धांत हे अनेकदा प्रथम यथार्थ मानले जातात. उदा $E = MC^2$ हा आईन्स्टाईनने चिन्हाच्या आश्रयाने मांडलेला सिद्धांत तो यथार्थ मानायलाही अनेकांनी नकार दिला होता पण नंतर तो यथार्थ मानला गेला आणि आज तो सत्य मानला जातो. मात्र प्रत्येक वेळी प्रत्यक्ष प्रमाणानेच एखादा सिद्धांत सत्य मानला जातो असेही नाही. उदाहरणार्थ, प्रकाशाच्या गतीने एखादी वस्तू प्रवास करेल तर तिचे वस्तूमान शून्य होईल हा सिद्धांत अद्यापही प्रत्यक्ष प्रमाणाधारे सिद्ध झालेला नाही पण तो अनुमान प्रमाणाधारे सत्यच मानला जातो.

मानवी व्यवहारातही अनेकदा ज्ञानाचे सत्यत्व चिन्हांच्या आधारेही स्वीकारले जाते. उदाहरणार्थ, एखाद्या व्यक्तीचा- तिला आपण 'क्ष' म्हणू - 'य' ह्या व्यक्तीने खून केला आहे की

नाही हे शोधायचे आहे. समजा न्यायाधिशाला 'य' ह्या व्यक्तीने 'क्ष' ह्या व्यक्तीला 'य' च्या हस्ताक्षरात पाठवलेली अरसल धमकीची पत्रे मिळाली. इतकेच नव्हे तर य ह्या व्यक्तीचा दुर्दैवाने आणि कायद्याच्या सुदैवाने खून झाला त्यावेळी एक कॅमेरा ऑन झाला होता आणि त्या कॅमेऱ्यात समजा 'य' ह्या व्यक्तिने 'क्ष' व्यक्तिचा केलेला खून ही घटना जशीच्या तशी शूट झालेली मिळाली. 'य' ह्या व्यक्तीला खून झालेल्या वेळी आपण तिथे नव्हतो हे सांगण्यासाठी एकही साक्षीदार आणता आला नाही. तर इथे केवळ चिन्हप्रमाणाच्या आधारे 'य' ह्या व्यक्तीने 'क्ष' ह्या व्यक्तीचा खून केला ही घटना सत्य म्हणून स्वीकारली जाईल व तिला शिक्षा दिली जाईल.

थोडक्यात, ज्ञानाची सत्यता तपासण्यासाठी सर्वच प्रमाणे महत्वाची आहेत. ज्ञानाची यथार्थता एका प्रमाणाने सिद्ध होऊ शकेल पण ज्ञानाची सत्यता मात्र एकाच प्रमाणाने सिद्ध होईल असे नाही. कदाचित ती एखाद्या प्रमाणाने होईल किंवा कदाचित दोन प्रमाणे लागतील. कदाचित तीन प्रमाणे लागतील आणि कुणी सांगावे तीन प्रमाणेही पुरणार नाहीत. कारण प्रमाणे परस्परविरोधातही जाऊ शकतात. उदा. प्रकाशाचे स्वरूप. इथे प्रकाश तरंग आणि कण ह्या दोन्ही परस्परविरोधी वाटणाऱ्या रूपात सापडला.

थोडक्यात ज्ञानाची सत्यता आणि ज्ञानाची यथार्थता ह्या दोन भिन्न पातळ्या आहेत.

एकदा हे विश्व आणि ज्ञान ही प्रक्रिया समजून घेतली की मग समाजाकडे वळता येईल. समाज आणि विश्व हे कोणत्याही अर्थाने भिन्न नाहीत किंवा त्यांच्यात द्वैत नाही. त्यामुळे विश्व जसे असते तसाच समाजही वरील पातळ्यांत असतो.

समाज म्हणजे मानव, मानवी संघटना व समूह यांच्यातील ब्राह्मण जाणीव, क्षत्रिय जाणीव, वैश्य जाणीव आणि दलित जाणीव ह्या चार जाणिवांतील परस्पर-संघर्षाचा, ताण्याबाण्याचा आणि समायोजनाचा व त्यांनी धारण केलेल्या मूर्त रूपे वअमूर्त रूपे यांचा संघात होय. जगातील कुठल्याही समाजात ह्या चार जाणिवा सुप्त, गुप्त आणि प्रकट स्तरावर अस्तित्वात असतात आणि आहेचे वस्तुरूपात वा मनरूपात रूपांतर करत असतात. ह्या स्वतःच मितितून जन्मतात आणि नंतर मितिकावर स्वार होऊन मितिकाचेही रूपांतर करू पाहतात. ह्या सर्वच जाणिवांची सखोल चर्चा करणे इथे शक्य नाही. फक्त ह्या जाणिवांची वैशिष्टचे सांगितली तरी ती इथे पुरेशी आहेत. ह्या जाणिवांना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि दलित अशी नावे दिली असली तरी त्यांचा जातींशी किंवा वर्णांशी कसलाही संबंध नाही हे लक्षात घेणे अत्यंत आवश्यक आहे. ह्या जाणिवा केवळ भारतातच नव्हे जगातील कुठल्याही समाजात आढळतात. उदा. ब्राह्मण ही जाणीव व त्यातील चिन्हप्रामाण्याचा पुरस्कार भारतातील ब्राह्मणांइतकाच मुस्लिम धर्मातील उलेमा, मुल्ला, मौलवी

किंवा ख्रिश्चन धर्मातील धर्मगुरू करत असतात.

## ब्राह्मण जाणीव

ही जाणीव प्रामुख्याने चिन्हप्रामाण्यावर उभी असते. इथे चिन्हांची सृष्टी महत्त्वाची असते तर विश्वाची 'आहे' ही पातळी केंद्रस्थानी असते. मात्र तिचा प्रत्यक्ष अनुभव हा अत्यंत दुर्मिळ असल्याने अनेकदा मधील ब्राह्मण हे चिन्हप्रामाण्याच्या आधारे राज्य करत राहतात. त्यांच्या जवळ आणि इतरांजवळही प्रत्यक्ष अनुभव नसल्याने हे राज्य बिनबोभाट चालते. त्यामुळेच 'आहे' ही पातळी बाजूला राहते आणि प्रतिविश्व म्हणजे परलोक अस्तित्वात येतो हा परलोक अर्थातच खोटा, आभासात्मक असतो. हिची संरचना पुढीलप्रमाणे-

**१. धार्मिक :**

(अ) ईश्वर किंवा देव आहे असे मानते. ईश्वर म्हणजे कोणी चालक शासक असतो तोच ह्या विश्वाची निर्मिती, सांभाळ आणि नाश करतो. हे विश्व ईश्वराचे असते. स्वर्ग आणि नरक अशी मृत्यूनंतरच्या जीवनाची कल्पना असते. ही कल्पना अर्थातच चिन्हांच्या सहाय्यानेच शक्य होते.

(ब) ईश्वरी अवतार किंवा प्रेषित ह्यावर श्रद्धा असते. त्यांची पूजा-अर्चा केली असता किंवा त्यांचे अनुकरण केले असता चांगल्या फळांची अपेक्षा असते.

(क) ईश्वराने निर्माण केलेल्या मंत्रतंत्रावर किंवा जादूवर विश्वास असतो किंवा ह्यांची ईश्वर किंवा ब्राह्मण किंवा देवदेवता ह्यांच्याकडूनच निर्मिती झाली असा विश्वास वाटतो.

(ड) ईश्वर आणि मानव यांच्यातला मध्यस्थ म्हणून ब्राह्मण काम करत असतो. ब्राह्मण हा धार्मिक गुरू व पापाचे विमोचन करणारा असतो, ईश्वर ह्या ब्राह्मणाचे ऐकतो, असा समज असतो.

(इ) कलाक्षेत्रात अभिजातवादाचा उदय.

**२. राजकीय :**

(अ) राजा किंवा प्रमुख हा ईश्वराचा अंश - सर्व भूमी ईश्वराची असते.

(ब) कायदे धार्मिक वा ईश्वरी असतात किंवा ईश्वर प्रेषिताकडून ते पाठवतो.

(क) ब्राह्मण हाच राजाचाही गुरू असतो. धर्माज्ञा त्यालाही मानावी लागते. किंवा राजा हाही धामिकतेचा अंश असतो.

**३. सामाजिक :**

(अ) समाज व मानव ईश्वरनिर्मित. आदि स्त्री व आदि पुरुष यांच्यातून ईश्वरानेच मानववंश निर्माण केल्याचा विश्वास. स्वर्ग वा नरक महत्त्वाचे. सृष्टीच्या पलीकडील गोष्टी महत्त्वाच्या.

(ब) ब्राह्मणांचे सामाजिक वर्चस्व. त्यांच्या मंत्रतंत्रामुळे घटना घडतात हा विश्वास.

(क) ब्राह्मण श्रेष्ठ, ब्राह्मण जाणीवही श्रेष्ठ; इतर तीन जाणिवा दुय्यम असतात.

(ड) कुटुंबसंस्था पूर्णपणे धार्मिक संस्काराखाली. पिता ईश्वराचा अवतार. माता ईश्वरी अवतार.

(इ) इथे व्यक्ति ही 'आहे' ह्या पातळीची, परलोकाची, परलोकातून हाकललेल्या आदी जोडप्याची किंवा परलोकाने / ईश्वराने वाचवलेल्या व्यक्ती वा मितिकाची बायप्रॉडक्ट म्हणून बघितली जाते. त्यामुळेच आपण सारे ईश्वराचे पुत्र, ईश्वराची लेकरे / अपत्ये, देवाचे पुत्र वगैरे कल्पना जन्मास येतात.

**४. आर्थिक :**

(अ) कुटुंब, उपजीविका व जागा ही ईश्वरामुळे मिळालेली व ब्राह्मणी व्यवस्थेद्वारा वा प्रत्यक्ष ब्राह्मणांद्वारा नियंत्रित.

(ब) ब्राह्मण जाणिवेत चिन्हप्रमाण्य हेच मुख्य प्रमाण असते आणि आर्थिक संरचना ईश्वरी कायद्यात फिरत राहते.

**५. शिक्षण :**

(अ) ईश्वरविषयक शिक्षण महत्त्वाचे. धार्मिक शिक्षणसंस्था महत्त्वाच्या. धर्म पारलौकिक असतो.

(ब) शिक्षण ब्राह्मण वर्गाच्या हातात.

(क) शिक्षणावर चिन्हप्रामाण्याचा प्रभाव. उदा. शब्दचिन्हे महत्त्वाची मानल्याने शब्दप्रामाण्य महत्त्वाचे. आत्मविद्या महत्त्वाची पण प्रत्यक्षात परलोकविद्याच शिक्षणावर प्रभुत्व गाजवते.

## क्षत्रिय जाणीव

परलोकाकडून भूमिकडे संक्रमण आणि सृष्टी (क्षेत्र) महत्त्वाची ठरणे हे क्षत्रिय जाणिवेचे केंद्रस्थान होय. तिची संरचना पुढीलप्रमाणे-

**१. धार्मिक :**

(अ) ईश्वर आहे. हे विश्व ईश्वरनिर्मित - स्वर्ग-नरकावर विश्वास. भूमी वा क्षेत्र राजाच्या वा

शासनाच्या वा सरंजामदाराच्या मालकीचे.

(ब) ईश्वरी अवतार वा प्रेषित ह्यावर विश्वास. पण हा अवतार ईश्वरातून मानवाकडे येण्याऐवजी मानवाकडून ईश्वराकडे गेला ह्या उन्नयनावर अधिक विश्वास.

(क) ईश्वरी धर्मग्रंथावर विश्वास.

(ड) ईश्वराकडे जाण्यासाठी मध्यस्थ नको - व्यक्तीवर विश्वास पण कर्मकांडावर अविश्वास. गुरू निवडण्याचे स्वातंत्र्य - ब्राह्मणाऐवजी गुरू महत्त्वाचा. मध्यस्थ म्हणून ब्राह्मणाचे महत्त्व दुय्यम.

(इ) गुरू व विद्वान ज्ञानाची लागवड करणारा शेतकरी होय. काहीवेळा सृष्टी हीच ईश्वर.

**२. राजकीय :**

(अ) राजा व राज्य ईश्वरी किंवा असाधारण, शासनाच्या सर्वंकष नियंत्रणाचा विस्तार - राजेशाही किंवा हुकुमशाही राष्ट्रवादाचा उदय - देशीवादाचा उदय. सरंजामदार राजाचे प्रतिनिधी. राज्यवाद प्रभावी.

(ब) कायदा करण्याचा अधिकार राजाला वा राज्याला. न्यायाधीश राजाच.

(क) राजा, राज्य हे गुरू व मार्गदर्शक. राजाज्ञा मोठी.

**३. सामाजिक :**

(अ) समाज म्हणजे राजाच्या / सरंजामदाराच्या / राज्याच्या प्रदेशातील मानवी समूह - जमीन (क्षेत्र) हा सामाजिक तत्त्वांचा मूल्य आधार.

(ब) व्यक्ती ही राज्यासाठी, भूमीसाठी ह्यातून रोमॅण्टीसिझमचा उदय व वास्तववादाचा उदय.

(क) राजाचे व राज्याचे वर्चस्व- अंतिम शब्द राजाचा / राज्याचा.

(ड) राजा व जमीनदार श्रेष्ठ -भूमी हीच भांडवल - शेती हेच साधन व साध्य. राज्य श्रेष्ठ.

(इ) राजा, राज्य हा कुटुंबाचा आदर्श-पितृसत्ताक चरमशिखरावर पिता हा कुटुंबाचा राजा. मुले ही प्रजा व स्त्री ही प्रजाच. इथे व्यक्ती ही सृष्टीची बायप्रॉडक्ट म्हणून बघितली जाते त्यामुळेच आम्ही मातीची लेकरे वगैरे कल्पना जन्मास येतात.

**४. आर्थिक :**

(अ) आर्थिक उत्पादनाची साधने जमीनदाराची, सरंजामदाराची व राज्याची पर्यायाने राष्ट्राची

भूमिनिष्ठ आर्थिक साधने.

(ब) राजाद्वारे, राज्याद्वारे अर्थव्यवस्था नियंत्रित.

(क) धार्मिक अंधश्रद्धांना आव्हान व ब्राह्मणांचे वर्चस्व नष्ट करण्याचा प्रयत्न. त्यामुळे आर्थिक तंत्रज्ञानात सुधारणेच्या शक्यता.

(ड) राज्यासाठी उत्पादन, भूमी जिंकण्याची स्वप्ने व झगडे.

५. **शैक्षणिक :**

(अ) सर्व शिक्षण राज्याला काय उपयोगी आहे त्याचा विचार करून भूकेंद्रित.

(ब) शिक्षण धार्मिक पगड्यातून मोकळे. परलोकविद्येइतकेच सृष्टीज्ञान (ऐहीक धर्मविद्या) महत्त्वाचे ठरते. दण्डनितीचे शिक्षणही महत्त्वाचे ठरते. विज्ञान केंद्रस्थानी.

(क) अनुमानात्मक प्रमाणाला महत्त्व- चिन्हप्रामाण्याला आव्हान. प्रत्यक्ष प्रमाणावर भर.

## वैश्य जाणीव

ही जाणीव महत्त्वाची आहे. कारण संपूर्ण विसावे शतक ह्या जाणिवेच्या प्रभावाखाली आहे. इथे प्रत्यक्ष प्रमाण हे महत्त्वाचे होय. सृष्टीऐवजी मानवी प्रतिसृष्टी केंद्रस्थानी येते. तिची संरचना पुढीलप्रमाणे

१. **धार्मिक :**

(अ) आहे हाच ईश्वर - विश्व ईश्वरनियंत्रित नाही. मानवकेंद्रित दृष्टिकोन. भूमी कुटुंबाची वा कुटुंबकर्त्याची/कर्तीची.

(ब) ईश्वरी अवतार, प्रेषित, किताब यावर श्रद्धा नाही.

(क) ईश्वराकडे जाण्यासाठी मध्यस्थ नको. गुरू असलाच तर गौण. शिष्याला महत्त्व.

(ड) गुरू हा स्पिरीच्युअल मॅनेजर. त्यामुळेच विद्वान हा ज्ञानाचा व माहितीचा मॅनेजर व उत्पादक होय.

२. **राजकीय :**

(अ) लोकशाहीचा उदय - लोकांचे राज्य - लोकांवर नियंत्रण मॅनेजरचे.

(ब) लोकांची संसद व लोकांचे कायदे - लोकप्रतिनिधी हे मॅनेजर.

(क) घटनेप्रमाणे राजकीय व्यवस्था- घटना हीच मार्गदर्शक - सरकार चालवणे म्हणजे कारखाना

चालवणे व मॅनेजमेंट करणे.

३. **सामाजिक :**

(अ) सर्व समान. व्यक्तिवादाचा घोष- विज्ञान, तंत्रज्ञान व मानवशास्त्रांचा प्रचंड विस्तार. कलेत वास्तववाद, अतिवास्तववाद वगैरे वादांचा गजबजाट.

(ब) व्यक्ती भूमीसाठी नसून व्यक्तीसाठी भूमी किंवा राज्य.

(क) व्यक्तिप्रधान कुटुंबरचना, कुटुंबातही लोकशाही तत्त्वांचा पुरस्कार. त्यामुळे स्त्रीनेही कमवायला हवे ही जाणीव. भूमी कुटुंबाची, मालमत्तेची मालकी कुटुंबाची.

(ड) भांडवलदार श्रेष्ठ, पैशावर श्रेष्ठत्व अवलंबून - मॅनेजर हा सत्ताधारी - शेती व कारखानदारी ही आंतरराष्ट्रीय. शेतीचे बाजारीकरण. व्यक्ती हीही क्रयवस्तूच्या सान्निध्यात अनेकदा क्रयवस्तू म्हणूनच बघितली जाते. राबवली जाते. इथे अनेकदा व्यक्ती प्रतिसृष्टीची, प्रतिसृष्टी तयार करणाऱ्या उत्पादन व्यवस्थेची व तंत्रज्ञानाची बायप्रॉडक्ट म्हणून बघितली जाते.

४. **आर्थिक :**

(अ) विज्ञान व तंत्रज्ञानाचे पूर्ण वर्चस्व. निसर्ग रूपांतरित करण्याची अत्याधुनिक साधने.

(ब) भांडवलशाही किंवा साम्यवादी अर्थव्यवस्था- बाजारव्यवस्थेचा उदय- प्रथम गरजेसाठी वस्तूंची निर्मिती; नंतर वस्तू खपाव्यात म्हणून गरजांची निर्मिती, स्पर्धेचा पूर्ण स्वीकार.

५. **शिक्षण :**

(अ) व्यक्तीसाठी शिक्षण. गुरू संकल्पनेचा अस्त. कामगार व मॅनेजर तयार करण्यासाठी धडपड.

(ब) प्रत्यक्ष प्रमाण हेच प्रमाण, वैज्ञानिक व तंत्रज्ञानात्मक शिक्षणपद्धतीचा उदय - शाळा ही कारखाना- विद्यार्थी शिकाऊ कामगार असतो. फॅक्टरीप्रमाणे शाळेचे वेळापत्रक व कामकाज असते. शिक्षण प्रतिसृष्टीकेंद्रित, त्यामुळे 'वार्ता' म्हणजेच प्रतिसृष्टी तयार करण्याचे तंत्रज्ञान - यंत्रज्ञान महत्त्वाचे.

(क) सरकार हा कारखाना तसेच शिक्षणसंस्था हाही कारखाना, कारखान्याचे मॉडेल हे सर्वव्यापी मॉडेल. त्यामुळे सर्वच देशांत समान कारखानदारी पद्धत व त्याला पूरक समान शिक्षणव्यवस्था. क्षत्रियजाणिवेत सृष्टीतील वस्तूंची अधिकाधिक शेती केली जाते, तर वैश्य जाणिवेत प्रतिसृष्टीतील वस्तूंची शेती केली जाते. यंत्र हा एका अर्थाने वैश्य जाणिवेचा नांगरच होय. पृथ्वीवरील खनिजे, कच्चा माल अंतर्गत भूमी ही जमीन होय. प्रतिवस्तूंची

निर्मिती ही हवामानाशी कमी निगडित असल्याने क्षत्रिय जाणिवेतील भूमीनिष्ठता कमी कमी होत जाते.

## दलित जाणीव

दलित जाणीव ही महत्त्वाची आहे. कारण आपण सर्व तिच्या प्रभावाखाली येऊ लागलो आहोत. इथे सर्व प्रमाणांचा लय होतो. प्रत्यक्ष हे चिन्हांसारखे तर चिन्हे ही प्रत्यक्ष होतात. ब्राह्मण जाणिवेत चिन्हे अद्भुत व अगोचरसूचक असतात. इथे ती अद्भूतता गमावतात. दलित जाणिवेत मानवी प्रतिसृष्टीबरोबर मानवी चिन्हसृष्टी केंद्रस्थानी येते. ह्या जाणिवेची संरचना पुढीलप्रमाणे :

**१. धार्मिक :**

(अ) ईश्वर नाही किंवा आहे ह्याविषयी मत नाही. अनेकदा नास्तिकतेकडेच कल. ईश्वर हे एक चिन्ह .

(ब) धार्मिक ग्रंथ हा 'चिन्ह', पंथांचा, वादांचा अंत. संघटित धर्मांचा लय किंवा संघटित धर्म चिन्ह म्हणून बघितला जातो.

(क) शून्याकडे जायचे असेल तर स्वतःचा मार्ग स्वतःच निवडायचा. गुरूही नको. मध्यस्थही नको आणि शिष्यांचे मीपणही नको. सत्याकडे जाण्याचा निश्चित मार्ग नाही. किंबहुना सत्य हे मार्गरहीत आहे किंवा प्रत्येक व्यक्तीला स्वतःचा मार्ग स्वतःच शोधावा लागतो असा विश्वास.

(ड) कलेत वादांचा अंत.

**२. राजकीय :**

(अ) राज्य सर्वांचेच. शासनसंस्थेचा अस्त किंवा स्पर्धाविरहित लोकशाही. भूमी ही अतिव्यक्तिगत बाब

(ब) लोकांचे राज्य, लोकांचे कायदे. घटना हीच शक्ती. शासन हे सेवाक्षेत्र.

(क) राज्य आवश्यक; पण लोकच कुठल्याही महत्वाच्या प्रश्नावर कॉम्प्युटरमधून मत पाठवतील. त्यामुळे प्रत्येक नागरिक संसदेचा सभासद. राज्य म्हणजे चिन्हांचा संघात.

(ड) सर्वांनाच राज्यसंस्थेत अधिकार. कायद्यात व्यक्तिगततेचा विस्तार व व्यक्तिगतेला प्रचंड वाव.

**३. सामाजिक :**

(अ) सामाजिक स्तरांचा नाश- समतेऐवजी सर्वच व्यक्ती मौलिक आहेत आणि प्रत्येक व्यक्तींची मौलिकता जोपासली पाहिजे हा विचार. थोडक्यात, समतेऐवजी मौलिकता. सेवा केंद्रीत व सुविधाकेंद्रीत क्षेत्रांची वाढ.

(ब) कुटुंबसंस्थेचा विलय- मुले समाजाची- प्रत्येक मुलामुलींचे सर्वचजण आईबाप- कुटुंबाऐवजी सेवाक्षेत्राकडून संगोपन- किंवा संगोपनाचे मॅनेजमेंट (क्रश ही त्याची सुरुवात मानता येईल)- फ्री सेक्स.

(क) व्यक्तीचे अनेकदा चिन्हात रूपांतर. तिच्याकडे केवळ एक चिन्ह म्हणून बघितले जाते. एका अर्थाने, इथे व्यक्ती चिन्हसृष्टीचे बायप्रॉडक्ट म्हणून बघितली जाते.

**४. आर्थिक :**

(अ) प्रत्येक कार्य मौलिक. त्यामुळे सर्वांना कामाच्या तासानुसार वाटा.

(ब) सर्व उत्पादन हे यंत्राद्वारेच होईल, कामापासून अधिकाधिक मुक्तता- कामाचे तास कमी कमी होत जातील. चिन्हीय यत्रांचे (Semiotic Machinery)चे उत्पादन उदा. टीव्ही., संगणक

(क) अर्थव्यवस्था ही सतत बदलणारी त्यामुळे महासिद्धांताचा आणि महाव्यवस्थापनाचा अंत.

(ड) आर्थिक व्यवस्थेवर चिन्हसृष्टीचा प्रचंड प्रभाव त्यामुळेच जाहिरात, मिडीया वगैरेंना प्रचंड महत्त्व. सेवा केंद्रांचा विस्तार.

**५. शिक्षण :**

(अ) व्यक्तींची मौलिकता ओळखून त्यानुसार तिला शिक्षण देणारी पद्धती. त्यामुळे स्थिर अशी शिक्षणपद्धती नाही. सतत बदलासाठी तयार करण्याची धडपड.

(ब) शिक्षण सर्वांनाच मुक्त व मोफत.

ह्या सर्व जाणिवा मानवी मनात आणि मानवी संस्थांत मूर्त आणि अमूर्त रूपात वावरत असतात. ह्यातील कधी चार, कधी तीन, कधी दोन, तर कधी एकच जाणीव एखाद्या घटनेत प्रधान असते. आरंभीला ब्राह्मण नंतर क्षत्रिय नंतर वैश्य नंतर दलित अशा क्रमाने त्या केंद्रस्थानी आल्यासारख्या दिसतात मात्र हा अनुक्रम असाच आहे असा मात्र माझा दावा नाही. समाजात कुठलीही जाणीव कधीही आणि कुठल्याही काळात केंद्रस्थानी येऊ शकते. उदा. काही इस्लामी देशात अचानक अलिकडे ब्राह्मण जाणीव केंद्रस्थानी

आलेली दिसते. थोडक्यात इथे अनुक्रमात्मक मांडणी भासते पण ती तशीच असेल असे नाही. ह्या जाणिवांचे ब्राद (ब्राह्मण दलित), दक्ष (दलित क्षत्रिय), वैद (वैश्य दलित), वैक्ष (वैश्य क्षत्रिय) वगैरे उपप्रकार पाडता येतील. त्यांना युग्म जाणीव म्हणता येईल. जिथे तीन जाणिवा एकत्र येतील तेव्हा त्यांना जाणीवत्रय म्हणता येईल उदाहरणार्थ, क्षवैद. ब्रादवै.

ह्या जाणिवांच्या प्रकाशात आपण अनेक घटना नीटपणे पाहू शकतो. उदाहरणार्थ, नामांतराची घटना ही वैब्रा घटना आहे. एकीकडे आंबेडकरांच्या नावाबाबत शब्दप्रामाण्याचा स्वीकार तर दुसरीकडे ज्या वैश्य जाणिवेतील समता ह्या तत्त्वासाठी लढत आहेत, त्या लढ्याचे तत्त्वज्ञान. जगाच्या इतिहासात प्रबोधन काळापर्यंत ब्राक्ष जाणीव प्रभावी दिसते तर नंतर वैद जाणीव प्रभावी ठरलेली दिसते आहे. कार्ल मार्क्स अपयशी ठरला ह्याचे कारण तो फक्त वैक्ष ह्या युग्मजाणिवेत वावरत होता. ब्राह्मण जाणिवेकडे त्याने साफ दुर्लक्ष केले. परिणामी ह्या ब्राक्ष जाणिवांनी सर्व व्यवस्था बिनधोक ताब्यात घेतली. त्याची दुसरी चूक वैश्य जाणिवेचे कामगार वैश्य जाणिवेतील भांडवलदाराशी तडजोड करू शकतील हे त्याच्या लक्षात आले नाही. रशियात तर ब्राह्मण जाणिवांनी मार्क्सलाच प्रेषित व दास कॅपिटललाच ईश्वरी ग्रंथ करून व्यवस्थित पुरोहितगिरी केली.

ह्या सर्व विवेचनातून महत्त्वाचा प्रश्न निर्माण होतो तो असा की, 'टीकास्वयंवर' मधल्या नेमाडे यांची जाणीव कोणती ? ह्या प्रश्नांचे उत्तर वैक्ष असे आहे. नेमाडे क्षत्रिय जाणिवेतून पूर्ण मोकळे झालेले नाहीत. त्यामुळेच त्यांच्या समीक्षेत क्षत्रिय आणि वैश्य जाणिवेचा सतत ताणाबाणा चाललेला आढळतो. नेमाडेंचा जातिव्यवस्थेकडे पाहण्याचा जो दृष्टिकोन आहे तो ही गोष्ट निर्विवादपणे सिद्ध करतो. नेमाडेंच्या एकंदर विचारसारणीत क्षत्रिय जाणीव ही प्रधान असल्याने नेमाडे जातिव्यवस्थेच्या विरोधात नाहीत हे लक्षात घेण्याजोगे आहे. ह्या संदर्भातील त्यांची भूमिका पान ३०४ वर त्यांनी पुढीलप्रमाणे मांडली आहे. ती वाचताना नेमाडे मराठ्यांचे नवीन राज्य तर स्थापन करायला निघालेले नाहीत ना, अशी शंका येते. नेमाडे म्हणतात,

*" आपण जातिव्यवस्थेऐवजी जातीयता हा शब्द वापरला असता तर बरं झालं असतं. जातिव्यवस्थेच्या मी विरुद्ध नाही; परंतु जातीयतेच्या मी विरुद्ध आहे. जातिव्यवस्था आपल्या देशात राहील. जातिव्यवस्थेशिवाय हिंदुस्थानातील अगणित समूहांची व्यवस्था टिकेल असे मला वाटत नाही. आपल्या अफाट जनसमुदायात धार्मिक, वांशिक, भाषिक इत्यादी अनेक सूक्ष्मातिसूक्ष्म*

*Mating Groups, बेटी व्यवहार करणारे समूह आपापली अस्मिता टिकवून स्वायत्त रीतीने जगत आले आहेत. त्यांच्यात परस्परांचा आदर करण्याची मूलभूत तत्त्वे आहेत. ह्या आपोआपच तयार झालेल्या आडव्या परस्परसमान रचनेला मी जातिव्यवस्था म्हणतो. परंतु या समूहांची उभी श्रेणीव्यवस्था लावण्याचे प्रयत्न कट्टर हिंदुत्ववादी पूर्वीपासून करत आलेले आहेत. असे प्रयत्न म्हणजे जातीयता. आपण जास्तीत जास्त कठोर प्रहार कशावर करायला पाहिजे तर तो जातीयतेवर ! मराठवाड्यातील लोकांनी जातीयतेबद्दल बोलणं नवीन नाही. वर्तमानपत्रांच्या, संस्थांच्या, राजकीय प्रणालीच्या आडून शिताफीनं हे जातीयतेचं विष आपल्यात पसरवलं जातं. महाराष्ट्रात तेराव्या शतकापासून सर्वच विचारवंतांनी जातीयतेवर प्रहार केलेला आहेच, परंतु तो अधिक खोलवर करणं आवश्यक झालं आहे. विशेषतः जातीयतेच्या उंचसखलपणानुसार तो बदलत जाईल."*

नेमाडे यांची ही भूमिका खोलवर जाऊन तपासणे आवश्यक आहे. कारण नेमाडेंनी भारतीय समाजाचे पान ८० वर वर्णन करताना त्याच्या दोन व्यवस्थांकडे लक्ष दिले आहे. एक जातिव्यवस्था आणि दुसरी देशव्यवस्था. नेमाडेंच्या दोन व्यवस्थांपैकी ही एक महत्त्वाची व्यवस्था असल्याने देशीयतेच्या भूमिकेतील नैतिक जाणीव तिच्यावर मोठ्या प्रमाणावर अवलंबून असणार हे उघड आहे.

जातिव्यवस्थेचा विचार नेमाडेंनी त्यांच्या पुस्तकात सतत मांडलाय खरा, पण त्याचा पुरेसा खोल विचार त्यांनी केलेला आहे असे दिसत नाही. नेमाडेंचे निष्कर्ष तपासायचे असतील तर आपणाला मात्र सखोल चर्चा करावी लागेल. मी इथे जे सिद्धांतन करतोय त्याला जातिव्यवस्थेची Theory of Knowledge असे म्हणता येईल. हा सिद्धांत पुरेशा सामग्रीसह सिद्ध करणे इथे शक्य नाही. भविष्यात ह्यावर एक स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याचा माझा मानस आहे हा सिद्धांत जुना आहे की नवा हे तज्ज्ञ ठरवतील.

समाजात नेहमीच ज्ञानाच्या चार पातळ्या अस्तित्वात असतात.

**१. अमूर्त अप्रत्यक्ष :** ह्या पातळीला प्रत्यक्ष प्रमाण नसते. मात्र ती अतिप्रत्यक्ष प्रमाणावर उभी राहते त्यामुळेच अनेकदा चिन्हप्रामाण्याचा इथे आधार घेतला जातो. ही नेहमीच अनंत, निराकार वगैरे गोष्टींविषयी बोलत असते. हिला वहन करणारे हे मानवापेक्षा नेहमी श्रेष्ठ मानले जातात. हिला अत्याधुनिक भाषेत स्पिरीच्युअल इंजिनिअरिंग असे मी म्हणतो. ह्याच तंत्रज्ञानातून यज्ञ, उपासना, पूजा-अर्चा वगैरे गोष्टी जन्मतात. इथे चिन्हप्रामाण्य महत्त्वाचे ठरते तर अतिप्रत्यक्ष प्रमाण हा कणा असतो.

**२. समूर्त अप्रत्यक्ष :** ह्या पातळीला प्रत्यक्ष प्रमाण नसते. मात्र अनुमानात्मक प्रमाणाचा इथे आधार घेतला जातो. हे अनंताने धारण केलेल्या सांत पण इतरांना अगोचर आणि त्या व्यक्तीला मात्र गोचर अशा गोष्टीविषयी बोलते. हिला मी आधुनिक परिभाषेत ह्युमन इंजिनिअरिंग असे म्हणतो. हिचे तंत्रज्ञानात्मक स्वरूप कायदा, नीती, शासन इत्यादी स्वरूपात असते. इथे अनुमानात्मक प्रमाण महत्त्वाचे ठरते.

**३. अमूर्त प्रत्यक्ष :** ह्या पातळीला प्रत्यक्ष प्रमाण असते. हेही प्रत्यक्ष जगात कृतीद्वारे सिद्ध होते. हे प्रामुख्याने मानवी शरीर, मानवेतर शरीर, प्राणीसृष्टी, वनस्पतीसृष्टी व इतर जे जे अस्तित्वात आहे त्याविषयी असते. ही प्रत्यक्ष गोचर गोष्टीविषयी बोलत असते आणि स्वतःची गोचर क्षमता सतत वाढवत राहते. उदाहरणार्थ, दुर्बिण हा डोळ्यांच्या गोचर क्षमतेचा विकास आहे. मात्र डोळ्याखेरीज दुर्बिणीला अर्थ उरत नाही. ही व्यक्तीला आणि इतरांनाही गोचर असलेल्या गोष्टीविषयी बोलते. हिला मी मटेरियॅलिस्टिक इंजिनिअरींग म्हणतो. हिच्यातून जगातली सर्व आधुनिक विज्ञाने, तंत्रशास्त्रे, तंत्रज्ञाने, उपकरणे जन्मली आहेत. इथे प्रत्यक्ष प्रमाण महत्त्वाचे ठरते.

**४. समूर्त प्रत्यक्ष :** ही पातळी कृती असते. ही मानव, मानवेतर जड जे जे अस्तित्वात आहे त्याविषयी असते. ही प्रत्यक्ष गोचर कृती असते. मी हिला ॲप्लाईड इंजिनिअरिंग म्हणतो. इथे प्रत्यक्ष प्रमाण हे महत्त्वाचे ठरते. त्याचबरोबरीने अतिप्रत्यक्ष प्रमाणही महत्त्वाचे असते.

सर्वसाधारणपणे मानवी इतिहासाच्या सुरुवातीच्या कालखंडात - १. पशुपालक संस्कृती २. कृषिनिष्ठ स्थिर संस्कृती ३. कृषिनिष्ठ भटकी संस्कृती ४. अन्न गोळा करून जगणारी संस्कृती अशा चार संस्कृती अस्तित्वात होत्या. ह्याशिवाय मासे मारणे, शिकार करणे हे प्रमुख व्यवसाय असलेल्या संस्कृती अस्तित्वात होत्या. वरील चारही जाणिवा व चारही ज्ञानाच्या पातळ्या कमी-जास्त प्रमाणात प्रत्येक टोळीत अस्तित्वात होत्या.

भारतात सिंधू संस्कृती ही प्रामुख्याने कृषिनिष्ठ स्थिर संस्कृती होती. व्यापाराचा प्रभाव तिच्यावर असावा. व्यापार करणारी ही संस्कृती मूलतः कृषीही करत असल्याने संपन्न होती. भारतात इतर संस्कृत्याही ह्याचवेळी अस्तित्वात होत्या; पण सिंधू संस्कृती ही खऱ्या अर्थाने एक विशाल पट असलेली संस्कृती होती. कदाचित अथेन्सप्रमाणे तिथे लोकशाही असेलही. ह्याबाबत काहीच विधान करता येत नाही; पण ज्याअर्थी त्यांची शस्त्रे विकसित नव्हती (ज्यामुळे ती आर्यांच्या पशुपालक संस्कृतीपुढे पराभूत झाली) त्याअर्थी ती स्पार्टन नव्हती. कृषि व व्यापार

नीट असल्याने आणि पाण्याची उपलब्धता असल्याने ती संपन्न असावी. आर्यांची आदिम ब्राह्मण जाणिवेने भारलेली पशुपालक संस्कृती व अनार्यांचीआदिम ग्राक्षवै जाणिवेने भारलेली संस्कृती यांच्यातील या संघर्षात आक्रमक आर्यांनी त्यांना पराभूत केले. ज्ञानाच्या बाबतीत सिंधू संस्कृती ही सरस होती. त्यांची नगररचना ह्याची साक्ष देते. पशुपालक आर्यांच्या दृष्टीने अमूर्त अप्रत्यक्ष पातळी ही सरस होती. कारण जगातल्या सर्व घडामोडी ते केवळ ब्राह्मण जाणिवेतून बघत होते. त्यांना लागणारा पाऊस व प्रजोत्पादन हे अमूर्त, अप्रत्यक्ष गोष्टीवर अवलंबून आहे हा त्यांचा विश्वास होता. तसेच नवीन भूप्रदेश पादाक्रांत करत जाणे ही त्यांची गरज होती. विजय मिळवून देणाराही देव असल्याने भूप्रदेश जिंकणे हेही देवांच्या हाती होते. साहजिकच अमूर्त अप्रत्यक्ष पातळी ही सरस ठरली. त्यानंतर समूर्त अप्रत्यक्ष पातळी सरस ठरली. आर्यांना मूलतः सुरुवातीला शेतीचा अत्यंत तिटकाराच असल्याने पराजित सिंधुवासीयांची अमूर्त प्रत्यक्ष पातळी व समूर्त प्रत्यक्ष पातळी ही त्यांच्या दृष्टीने अत्यंत दुय्यम दर्जाची बनली. ज्ञानाची उभा अक्ष दर्शविणारी एक श्रेणीच तयार झाली (जगात जवळजवळ सर्वत्रच हा प्रकार घडला). ह्या श्रेणीत सर्वश्रेष्ठ जेते असलेल्या आर्यांची अमूर्त अप्रत्यक्ष पातळी सर्वश्रेष्ठ ठरली. त्याखालोखाल समूर्त अप्रत्यक्ष पातळी सरस ठरली व सर्वांत शेवटी क्रमांक लागला तो समूर्त प्रत्यक्ष पातळीचा ! मानवात पहिल्यापासूनच अमूर्त प्रत्यक्ष व समूर्त प्रत्यक्ष पातळीच्या आधारे जे काम करणारे लोक होते त्यांना अमूर्त अप्रत्यक्ष-समूर्त अप्रत्यक्षवाल्या लोकांपेक्षा खालच्या दर्जाचे मानले गेले. रथ घडवणाऱ्या सुताराच्या सुतारज्ञानापेक्षा तथाकथित पाऊस पाडणारे भगत किंवा ब्राह्मणाचे मंत्र महत्त्वाचे ठरले. घरची कामे ही तर ह्या तळाच्या दोन पातळ्यांच्या आधारेच केली जातात त्यामुळे त्यांना तर सर्वांत खालचे स्थान मिळाले. आजदेखील खोली सुंदर रीतीने झाडून साफ करणे हे रिलेटीव्हिटी शिकवण्याइतके महत्त्वाचे आहे ह्यावर आम्हा लोकांचा विश्वास नाही. घरच्या कामाचे ज्ञान हे असे शेवटच्या दर्जाचे मानले गेल्यानेच स्त्री ही शूद्र मानली गेली. ब्राह्मण जातीत जन्मलेली स्त्री आपल्या ज्ञानाकडे बघण्याच्या दृष्टिकोनामुळेच क्षुद्र बनलेली दिसते. ज्यावेळेला आदिम समाजात ब्राह्मण जाणीव व अमूर्त सप्रत्यक्ष पातळी ही पुरुषप्रधान झाली (विशेषतः किताबी ब्राह्मण जाणीव ही तर पूर्णतः पुरुषप्रधान जाणीव आहे) तेव्हापासून पितृसत्ताक पद्धत अस्तित्वात आली आणि स्त्रीचे समाजातले स्थान तेव्हापासून अधिकाधिक दुय्यम बनत गेले. काही आदिम समाजात अमूर्त प्रत्यक्ष पातळी व समूर्त प्रत्यक्ष पातळी ही स्त्रियांच्या हातात होती व ती स्त्रीकडून स्त्रीकडे संक्रमित होत असे. अशा समाजावर स्त्रियांचेच वर्चस्व असल्याचे दिसते. ह्या सर्व प्रक्रियेत ढोर फाडण्याचे ज्ञान किंवा पायताण तयार करण्याचे ज्ञान हे सर्वांत

दुय्यम बनत गेले आणि त्यातूनच अस्पृश्यता निर्माण झाली. ह्याला जोड मिळाली ती अनार्यांच्या श्रमण संस्कृतीतील पुनर्जन्म व कर्मफलसिद्धांताची। आर्यांनी अनार्यांचा हा सिद्धांत पुरेपूर वापरला व अनार्यांतील ब्राह्मण क्षत्रियांनी त्यांना साथ दिली. जगभरच ब्राह्मण आणि क्षत्रिय जाणीव हातात हात घालून वाटचाल करताना दिसते. त्यामुळेच जातिव्यवस्था ही अनुवंशिक बनली आणि वैश्य (ह्यांना झळ कमी पोहचली) शूद्र व अस्पृश्य ह्या तिन्ही वर्णांना ब्राह्मण क्षत्रिय जाणिवेचे कायमचे दास्यत्व पत्करण्याची वेळ आली. महावीर व बुद्ध ह्या वैश्य जाणिवेच्या व्यक्तींनी ह्याविरुद्ध बंड केले खरे; पण अमूर्त प्रत्यक्ष ज्ञानाच्या पातळीचा डाय व माहिती त्यावेळी कमी असल्याने त्यांची ही बंडे हवेत विरून गेली. कारण पाऊस का पडतो ? यांसारख्या मूलभूत प्रश्नांचे चुकीचे का होईना पण 'देव पाडतो' हे उत्तर ब्राह्मण जाणिवेकडे होते. असे कोणतेही उत्तर बुद्ध वा महावीराकडे नसल्यानेच ही बंडे अपयशी झाली. कारण तत्कालिन लोकांचे समाधान करणारी उत्तरे ब्राह्मण व क्षत्रिय जाणिवेने दिली. परिणामी बौद्ध, जैन इत्यादी सर्व धर्म ब्राह्मणी जाणिवेच्या ताब्यात गेले. आजही स्त्रीमुक्तीसाठी भांडणारी स्त्री आपल्या घरातील भांडी घासणाऱ्या बाईला जी वागणूक देते ती ह्या जातिव्यवस्थेतील ज्ञानाची रचना नीट न केल्यामुळे हे सहज इथे लक्षात येईल. जमिनीतून पीक का उगवते ? पाऊस का पडतो ? जग केव्हा निर्माण झाले ? ह्या कुणालाही पडणाऱ्या प्रश्नांची उत्तरे चुकीची का होईना पण ब्राह्मण जाणिवेकडे असल्याने आणि तत्कालीन वैश्य जाणिवेकडे ती नसल्यानेच ब्राह्मण जाणीव आपले श्रेष्ठत्व सिद्ध करू शकली. अन्यथा ती केव्हाच दुय्यम बनून गेली असती. (आजही ब्राह्मण जाणिवेचे काही तत्वज्ञ प्रत्यक्षांशी नाळ तोडून फक्त चिन्हांचा कीस पाडण्यात गढून गेले आहेतच. तत्त्वज्ञान म्हणजे फक्त चिन्हांचा अभ्यास असे म्हणण्याइतपत चिन्हप्रामाण्य आज उंच झालेले दिसते. प्रत्यक्ष जीवनात मात्र ह्या ब्राह्मण जाणिवेचे महत्व कमी होत चाललेय. ह्यांच्या तथाकथित भाषा-तत्वज्ञानाला प्रत्यक्ष जगात व जगण्यात महत्त्वाचे स्थान उरलेले नाही. मला इथे त्यांचे महत्व कमी लेखायचे नाही; पण त्याबाबतची वस्तुस्थिती मात्र सांगावीशी वाटते.)

जातिव्यवस्थेत कार्यरत असलेल्या ज्ञानाची ही प्रक्रिया व स्तरीकरण तपासले की उपजाती का निर्माण झाल्या ते सहज लक्षात येते. उपजातींच्या निर्मितीमागे अनेकदा एखाद्या तंत्रज्ञानात्मक तपशीलातला फरक कार्यरत दिसतो. ह्यालाच नंतर अनेक गोष्टींची व अपघातांची जोड मिळालेली दिसते. वरील विवेचनावरून जातिव्यवस्था ही एक विशिष्ट वर्गाने निर्माण केलेली मानवनिर्मित अशी व्यवस्था आहे हे स्पष्ट होईल.

ह्या जातिव्यवस्थेचा सर्वांत मोठा फायदा ब्राह्मणांना व जवळ जवळ त्यांच्या बरोबरीने

क्षत्रियांना मिळालेला दिसतो. आजही आपल्या जातीतील मुली इतर जातीत द्यायला नकार देणारा वर्ग मराठा आहे. एकीकडे ब्राह्मण जातीतून ब्राह्मण जाणीव नाहीशी होत असताना मराठा वर्ग मात्र अद्याप आपली क्षत्रिय जाणीव सोडायला तयार नाही. आजही ह्या देशात राजकीय सत्तेला जे कमालीचे महत्त्व आहे, त्यामागे क्षत्रिय जाणीव कार्यरत आहे. ह्या लोकांचा समाजवाद हा एका अर्थाने येऊ घातलेल्या वैश्य जाणिवेला ताब्यात ठेवण्याचा क्षत्रिय जाणिवेचा शेवटचा प्रयत्न होता. त्यामागे कसलीही दलित जाणिवेविषयी आस्था नव्हती. त्यामुळे त्यांचे अपयश अटळ होते. नामांतराला ह्या लोकांनी विरोध केला ह्याचे त्यामुळे आश्चर्य मानण्याचे काहीच कारण नव्हते. नेमाडे हेही ह्या क्षत्रिय जाणिवेच्या संस्कारात वाढल्यानेच त्यांनी जातीयतेला विरोध केला आहे, जातिव्यवस्थेला नाही.

त्यांच्या एकेका विधानाचा आता ह्या पार्श्वभूमीवर विचार करू. त्यांनी जातिव्यवस्थेपासून जातीयता वेगळी काढली आहे. हे म्हणजे शरीर यंत्रणेपासून शरीर वेगळे काढण्याचा प्रकार आहे. जातिव्यवस्था आहे म्हणूनच जातीयता आहे. जातिव्यवस्थेशिवाय हिंदुस्थानातील अगणित समूहांची व्यवस्था टिकेल असे त्यांना वाटत नाही. जणू काही जातीयता माणसाच्या पोटातून आल्याच्या थाटात नेमाडे इथे बोलत आहेत. जातीयता ही एक मानवी व्यवस्था आहे आणि कोणतीही मानवी व्यवस्था काही कारणांनी टिकत असते. ही कारणे नष्ट झाली की मानवी व्यवस्थाही नाहीशी होते. जातीजातीत लग्ने करणे हे जातिव्यवस्था टिकविण्याचे मोठे कारण असले तरी मुळातच महाविद्यालयातून जातीजातीत जे अभिसरण सुरू झाले आहे ते हळूहळू बेटी-बंदी तोडेल हे स्पष्टच दिसते आहे. रोटीबंदी तर आता संपतच आलीय. हळूहळू ह्या सगळ्या बन्दचा तुटणे ही अपरिहार्य प्रक्रिया आहे. कारण मुळातच जातिव्यवस्था तीन गोष्टींच्या आधारे उभी होती. (१) जन्मानुसार ज्ञान, व्यावसायिक ज्ञान व त्यानुसार व्यवसाय, (२) रोटीबंदी, (३) ग्रामीण अर्थव्यवस्था (बलुतेदार पद्धत) ह्या सर्व गोष्टी भारतीय समाजातून हळूहळू नाश पावण्याच्या मार्गावर आहेत. तेव्हा जातिव्यवस्था टिकेल ह्या नेमाडेंच्या मताला फारसा अर्थ नाही. नेमाडे जातिव्यवस्थेची उभी श्रेणी-व्यवस्था नाकारतात, आडवी स्वीकारतात. कुठल्याही गोष्टीची केवळ रुंदी स्वीकारायची आणि उंची नाकारायची हे मुळातच शक्य नसते. तरीही नेमाडेंच्या मताप्रमाणे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व दलित समाज श्रेणीव्यवस्थेतून मुक्त झाले आणि सर्वांनी सर्व वर्ण समान अशी भूमिका स्वीकारली तरी आडव्या श्रेणीत जन्मानुसार व्यवसाय ही गोष्ट तशीच राहते. नेमाडेंच्या ह्या कल्पनेप्रमाणे बाबासाहेब आंबेडकरांनी लिखाण करायलाच नको. नेमाडेंना हे अभिप्रेत नसेल अशी मी आशा व्यक्त करतो. कदाचित जन्मजात व्यवसाय त्यांना नाकारायचा असेल

(प्रत्यक्षात संपूर्ण पुस्तकात त्यांनी कुठेही असे म्हटलेले नाही). पण जन्मजात व्यवसाय व श्रेणीव्यवस्था नाकारली तर जातिव्यवस्थेत उरतेच काय ? जातिव्यवस्था ही केवळ विवाहमंडळाची जंत्री होईल. आता ही विवाहमंडळे तरी नेमाडेंना टिकावीत असे का वाटते ? शास्त्रीयदृष्ट्या त्यांच्याकडे ह्यासाठी काही आधार असेल असे वाटत नाही. ही केवळ सामाजिक सोय म्हणून नेमाडेंना पहायचे असेल तर हा मोठा विनोद आहे एवढेच मी म्हणेन. नेमाडेंच्या पिढीने आपल्या आई-बापांना विचारून जातीतच लग्न केले असेल; पण झपाट्याने बदलत चाललेल्या परिस्थितीचा वेग बघता एकविसाव्या शतकात मुले, मुली परस्परच ठरवून लग्न करतील हे उघड दिसते. नेमाडे क्षत्रिय जाणिवेत वाढल्यामुळे व वैश्य जाणिवेचा आवाका त्यांच्या लक्षात न आल्याने कशी गफलत करतात, त्याचे हे एक उदाहरण आहे. नेमाडे जे श्रेय इथल्या वारकरी संप्रदायाला देतात ते मात्र अत्यंत चुकीचे आहे. जातिव्यवस्था ही मूलतः ज्ञानाच्या रचनेमुळे (उतरंडीमुळे) अवतरली. ह्यातील जे ब्राह्मण जाणिवेचे आध्यात्मिक ज्ञान होते त्यावरच वारकऱ्यांनी प्रहार केले. पण ब्राह्मण जाणिवेने क्षत्रिय, वैश्य जाणिवांचा केलेला वापर व ज्ञानाची उतरंड दर्शविणारी रचना ह्याबाबतीत त्यांचे प्रतिकार शून्य होते. ब्राह्मण जाणिवेबाबत काही मूलभूत काम वारकरी संप्रदायाने केले असे म्हणवत नाही. विष्णूच्या जागी विठ्ठल आला म्हणजे फार काही परिवर्तन होत नाही किंवा टाळ कुटून अभंग म्हटले म्हणजे समाजव्यवस्था बदलत नाही. नेमाडेंचा वारकऱ्यांबाबत काहीतरी घोटाळा आहे एवढे निश्चित. भक्तिसंप्रदायाने सर्वांना आध्यात्मिक स्वातंत्र्य मिळवून दिले असेल पण ती काही फार महत्त्वाची बाब नव्हे. उपाशी पोटी अध्यात्म सांगण्यातला हा प्रकार आहे. तो तुकारामांना पेललेला असेल; पण सामान्य माणसाचे काय ? त्याच्यासाठी ब्राह्मणी जाणिवेचा वरवंटा तसाच राहिला. स्मृती तशाच राहिल्या. कायदे तेच राहिले. तेव्हा वारकरी पंथाबाबत ह्या संदर्भात तरी फार बोलावे असे मला वाटत नाही. कळीचा मुद्दा इतकाच की, नेमाडेंच्या देशीयतेचा जातिव्यवस्था हा जो आधार आहे तो नष्ट होत जाणे अटळ आहे. भविष्यात काही काळ ती दबाव गट म्हणून काम करेल असे वाटते. किंबहुना जातींचे वेगवेगळे दबाव गट बनून त्यांनी सामाजिक, राजकीय, आर्थिक, धार्मिक, शैक्षणिक पातळीवर आपापल्या तृष्णांच्या पूर्तीसाठी राजकारण, सत्ताकारण, अर्थकारण, समाजकारण आणि शिक्षणकारण करायला सुरवात केलेली आहे. त्यांच्या आपापसातील क्रिया प्रतिक्रिया आता केंद्रस्थानी यायला सुरवात झाली आहे. ह्या क्रिया प्रतिक्रियातूनच हळूहळू जातिव्यवस्था नष्ट होणे अटळ आहे.

